# नवभारत

वर्ष २३ वे ] ऑगस्ट १९७० [ अंक ११



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका









नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष तेविसावे
अंक अकरावा

# नवभारत

ऑगस्ट
१९७०

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )





वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज दादर मुंबई २८.

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

अनुक्रमणिका








डॉ. वा. वि. मिराशी

# मूळ हरिवंशाचा काल

पुण्याच्या भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंडळाने सन १९१९ मध्ये महाभारताची चिकित्सक आवृत्ति संपादून प्रकाशित करण्याचा संकल्प केला आणि अनेक विद्वानांच्या साहाय्याने आणि सुमारे पन्नास वर्षांच्या अविरत परिश्रमात ते कार्य पुरे केले. हरिवंशाला महाभारताचे खिल पर्व किंवा परिशिष्ट पर्व मानण्यात येते. त्याचीही चिकित्सक आवृत्ति प्रकाशित झाल्याशिवाय महाभारताचे संपादन पुरे झाले असे म्हणता यावयाचे नाही. म्हणून महाभारताचे तिसरे आणि शेवटचे संपादक डॉ. प. ल. वैद्य यांनी महाभारताचे काम पूर्ण केल्यावर हरिवंशाच्या संपादनाचे काम हाती घेतले. त्यांनी आता ते पुरे केले असून हरिवंशाचा पहिला भाग नुकताच प्रसिद्ध केला आहे. त्यात प्रस्तावना, हरिवंशाची चिकित्सक आवृत्ति आणि टिप्पण्या अन्तर्भूत आहेत. दुसऱ्या भागात प्रक्षिप्त उतारे यावयाचे असून तो भाग अद्यापि प्रकाशित झाला नाही.

हरिवंशाच्या या चिकित्सक आवृत्तीकरिता डॉ. वैद्य यांनी त्या ग्रंथाच्या चार छापील आवृत्त्या आणि भारताच्या भिन्न भिन्न प्रदेशांतून मिळविलेली आठ लिपीत लिहिलेली ३६ हस्तलिखिते यांचा उपयोग केला आहे. हरिवंशाचा मूळ पाठ ठरविण्याकरिता खालील अत्यंत प्राचीन अशा हस्तलिखितांचा फार उपयोग झाला- (१) शारदा लिपीत भूर्जपत्रावर लिहिलेले सुमारे पाचशे वर्षापूर्वीचे हस्तलिखित. यातील पाठ उत्तर भारतात प्रचलित असावे. (२) नेपाळमध्ये मिळालेले नेवारी लिपीत ताडपत्र्यांवर लिहिलेले हस्तलिखित. हे सुमारे अकराव्या शतकातील असावे. यातील पाठ भारताच्या ईशान्य भागात प्रचलित असावे. (३) केरळमध्ये मलायलम लिपीत लिहिलेली ताडपत्रांवरील तीन हस्तलिखिते. यातील पाठ दक्षिण भारतात प्रचलित असावे.

हिंदुस्थानच्या भिन्न भिन्न भागातून मिळविलेल्या ह्या हस्तलिखितांतील हरिवंशाच्या पाठात आश्चर्यकारक साम्य असून त्यात ते खिल पर्व सर्वात लहान आकाराचे आढळते. म्हणून डॉ. वैद्यांनी आपली चिकित्सक आवृत्ति मुख्यतः त्या हस्तलिखितांवर आधारली आहे. उपोद्बलक प्रमाण म्हणून क्षेमेंद्राच्या भारतमञ्जरीचा उपयोग केला आहे. क्षेमेन्द्र हा काश्मीरी कवि अकराव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेला. त्याने आपल्या भारतमंजरीत हरिवंशासह महाभारताची संक्षिप्त आवृत्ति दिली आहे. त्यावरून त्याच्या काळी हरिवंशाचा कोणता भाग प्रचलित होता याचे अनुमान करता येते, विशेष उल्लेखनीय गोष्ट ही की वरील प्राचीनतम हस्तलिखितांत आणि भारतमंजरीत हरिवंशाच्या विस्तारासंबंधी एकवाक्यता आहे. कालाच्या ओघात हरिवंशात अनेक आख्याने वगैरे प्रक्षिप्त केली गेली. ती जशी वरील हस्तलिखितात आढळत नाहीत तशीच ती भारतमंजरीतही संक्षेपिलेली दिसत नाहीत.

डॉ. वैद्यांची ही चिकित्सक आवृत्ति हरिवंशाच्या छापील आवृत्त्यांपेक्षा पुष्कळच लहान आहे. छापील आवृत्तीत ३१८ अध्याय आणि १८००० श्लोक आहेत, तर चिकित्सक आवृत्तीत ११८ अध्याय व फक्त ६०५३ श्लोक आहेत. म्हणजे चिकित्सक आवृत्ति छापील आवृत्तीच्या सुमारे एकतृतीयांश आहे. मूळचे हरिवंश यापेक्षाही लहान असून त्यात चिकित्सक आवृत्तीतील पहिले ९८ अध्यायच असावे असा डॉ. वैद्यांचा तर्क आहे. पण पुढील २० अध्यायांस पूर्वोक्त प्राचीनतम हस्तलिखितांचा आधार असल्यामुळे त्यांनी ते चिकित्सक आवृत्तीत घेतले आहेत.

या मूळ हरिवंशात वेळोवेळी भर पडून कालाच्या ओघात त्याला सध्याचे विस्तृत स्वरूप प्राप्त झाले. या प्रक्षेपांचे स्वरूप खालील श्लोकांत सांगितले आहे-








संग्रामश्च विवाहश्च स्तुतिर्देववरादिकम् ।
प्रक्षेपकारणान्याहुः पञ्चमं च फलश्रुतिः ॥

– युद्धाची आणि विवाहाची वर्णने, देवादिकांची स्तुति, त्यांनी दिलेले वर आणि त्यामुळे झालेले अनर्थ आणि ग्रंथाच्या पठणाची आणि श्रवणाची फलश्रुति या पाच कारणांनी मुख्यत्वेकरून ग्रंथात प्रक्षेप घातले जातात. डॉ. वैद्यांनी अशा काही प्रक्षेपांची चर्चा प्रस्तावनेत केली आहे.

## मूळ हरिवंशाचा काल

चिकित्सक आवृत्तीतील हरिवंश पर्व ख्रिस्तोत्तर ४०० च्या सुमारास लिहिले गेले असावे असे डॉ. वैद्यांनी एके ठिकाणी म्हटले आहे (प्रस्तावना, पृ. १५) तर इतरत्र हा काल सुमारे सन ३०० असा दिला आहे (प्रस्तावना पृ. ३९) त्यावेळी त्याचे पहिले ९८ अध्यायच असावे. नंतर सन १०५० पर्यंत त्यात ९९ ते ११८ या अध्यायांची भर पडलेली दिसते. त्यातील हा भाग क्षेमेन्द्राच्या भारतमंजरीत आढळतो. छापील आवृत्तीतील इतर काही भाग सन १०५० नंतर प्रक्षिप्त झाले असावे. हे प्रक्षिप्त भाग चिकित्सक आवृत्तीच्या दुसऱ्या भागात दिले जातील.

मूळ हरिवंशाच्या या कालाला डॉ. वैद्यांनी प्रस्तुत आवृत्तीत प्रमाण दिले नाही. तथापि त्याचे अनुमान करणे शक्य आहे.

इ. स. च्या पाचव्या शतकाच्या मध्यापासून कोरीव लेखातील दानपत्रात भगवान् व्यासाचे शापाशीर्वादात्मक श्लोक दिलेले आढळतात. ते महाभारतातून घेतले होते. सन ५३३–३४ च्या खोह येथील शर्वनाथाच्या दानपत्रात ' उक्तञ्च महाभारते शतसाहस्र्यां संहितायां परमर्षिणा पराशरसुतेन वेदव्यासेन । ' असा महाभारताचा 'एक लक्ष श्लोकांची संहिता ' म्हणून उल्लेख आला आहे.[1] तेव्हा इ. स. च्या पाचव्या शतकापूर्वी महाभारताला सध्याचे विशाल रूप प्राप्त झाले असावे. हरिवंशाप्रमाणे महाभारतातही वेळोवेळी अनेक भाग प्रक्षिप्त केले होते. पाचव्या शतकात महाभारताची श्लोकसंख्या एक लक्ष किंवा त्यासारखी विशाल झाली असल्यास त्यात त्यावेळी हरिवंशाचा अंतर्भाव झाला असला पाहिजे. नाहीतर या विशाल श्लोकसंख्येची उपपत्ति लावता येणार नाही. सध्या प्रचलित असलेल्या उत्तरभारतीय आवृत्तीत स्वर्गारोहणपर्वापर्यंत ८४००० श्लोक आहेत. यात हरिवंशाच्या उत्तर भारतीय आवृत्तीतील १६००० श्लोक मिळविले असता लक्ष श्लोकसंख्या पुरी होते. दक्षिण भारतीय आवृत्तीत ही संख्या एक लक्ष वीस हजार होते. भांडारकर मंडळाने प्रकाशित केलेल्या चिकित्सक आवृत्तीत सुमारे ७३००० श्लोक आहेत. हरिवंशाच्या चिकित्सक आवृत्तीत ६०७३ श्लोक आहेत हे मागे सांगितले आहे. या दोन श्लोकसंख्यांची बेरीज एक लक्ष होत नाही खरे, तथापि ' शतसाहस्री संहिता ' याने पूर्ण लक्ष श्लोकसंख्या विवक्षित नसून ' फार मोठ्या श्लोकसंख्येचा ग्रंथ ' एवढाच अर्थ अभिप्रेत असावा. अर्थातच ही संख्या हरिवंशाशिवाय अशक्य असल्याने त्या काळी म्हणजे इ. स. च्या पाचव्या शतकात हरिवंश प्रचलित असला पाहिजे. तेव्हा तो सुमारे इ. स. ३०० किंवा ४०० मध्ये रचला असावा असा डॉ. वैद्य यांचा तर्क दिसतो.

पण हा तर्क अनुमानाधिष्ठित आहे. यापेक्षा प्रबळ प्रमाणावरून मूळ हरिवंशाचा काळ ठरविता आल्यास ते इष्ट होईल. म्हणून तसा यत्न करू.

हरिवंशामध्ये मुख्यतः भगवान कृष्णाची वंशावळ व चरित्र आले आहे. त्या चरित्रात पारिजातहरण ही एक महत्त्वाची घटना आहे. कामरूपाचा ( सध्याच्या आसामचा ) राजा नरकासुर याने देवमाता अदितीची कुंडले बलात्काराने नेली होती ती परत मिळविण्याकरिता इंद्राने प्रार्थना केल्यावरून कृष्णाने सत्यभामेला घेऊन नरकासुराच्या प्राग्ज्योतिषपुर राजधानीवर चाल केली आणि नरकासुराला ठार मारून त्याने बंदीत टाकलेल्या गन्धर्व व असुर यांच्या कन्यांना बंधमुक्त केले. नंतर स्वर्गात जाऊन अदितीला ती कुंडले अर्पण केली, इंद्राच्या उद्यानांतील पारिजात वृक्ष उपटून गरुडावर घातला आणि तो द्वारकेला परत आला अशी ही पारिजातहरणाची कथा आहे. कृष्णचरितात ती महत्त्वाची असल्याने कृष्णाला त्या कथेच्या वर्णनपर काही अध्यायांच्या पुष्पिकेत( Colophons मध्ये ) ' पारिजात ' म्हटले आहे.

---
1. फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, पृ. १३७.








या पारिजातहरणकथेची दोन रूपे हरिवंशाच्या छापील आवृत्तीत (उदाहरणार्थ, चित्रशाळेने सन १९३६ मध्ये प्रकाशित केलेल्या आवृत्तीत) आढळतात. एक विष्णुपर्वाच्या अध्याय ६४[१] मध्ये दिले आहे. अध्याय ६३ मध्ये मागे सांगितल्याप्रमाणे कृष्णाचे साहाय्य मागण्याकरिता इंद्राचे द्वारकेत आगमन, कृष्णाला प्रार्थना, त्याने दिलेल्या गरुडावरून कृष्णाचे सत्यभामेसह प्राग्ज्योतिषपुरावर आक्रमण, नरकासुरवध, स्वर्गात जाऊन अदितीला कुंडलार्पण वगैरे वर्णिल्यावर खालील श्लोक आले आहेत-

स ददर्श महाबाहुराक्रीडे वासवस्य ह ।
दिव्यमभ्यर्चितं देवैः पारिजातं महाद्रुमम् ।।
नित्यपुष्पधरं दिव्यं पुण्यगन्धमनुत्तमम् ।
यमसाद्यजनः सर्वो जातिं स्मरति पौर्विकीम् ।।
... ... ... ...

उत्पाट्यारोपयामास विष्णुक्तं गरुडोपरि ।
सोऽपश्यत्सत्यभामा च दिव्यमप्सरसां गणम् ।।
... ... ... ...

श्रुत्वा तं देवराजस्तु कर्म कृष्णस्य तत्तदा ।
अनुमेने महाबाहुः कृतकर्मेति चाब्रवीत् ।।

– या श्लोकांत कृष्णाने इंद्राच्या उद्यानात सदैव पुष्पित आणि सुगंधी असणारा पारिजात वृक्ष पाहिला. नंतर तो उपटून त्याने गरुडावर घातला आणि तो सत्यभामेसह द्वारकेला आला. नंतर इंद्राला ते समजल्यावर 'झाले ते झाले' असे म्हणून त्याने त्याला संमति दिली.

पारिजातहरणकथेचे हे रूप प्राचीन दिसते. ते चिकित्सक आवृत्तीच्या अध्याय ९२ मध्ये (श्लो. ६३–६७ मध्ये) आले आहे. हीच कथा महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीच्या द्रोणपर्वात (अध्याय १०, श्लो. २२–२३ मध्ये) आली आहे.

वैनतेयं समारुह्य त्रासयित्वामरावतीम् ।
महेन्द्रभवनाद्वीरः पारिजातमुपानयत् ।।
तच्च मर्षितवान् शक्रो जानंस्तस्य पराक्रमम् ।
राज्ञां चाप्यजितं कश्चित् कृष्णेनेह न शुश्रुम ।।

हरिवंशाची चिकित्सक आवृत्ति आणि क्षेमेन्द्राची भारतमञ्जरी यात सर्वत्र साम्य आढळते असे मागे म्हटले आहे. ते याही बाबतीत आढळते. भारतमञ्जरी-तील खालील श्लोक (हरिवंश, श्लो. ११३५–३६) पाहा-

ददर्श नन्दनोत्तंसं सर्वकामप्रदं सदा ।
पारिजातं सुधाजातमभिजातमिवेश्वरम् ।।
तं दृष्ट्वा नयनानन्दबान्धवः माधवः स्वयम् ।
समुत्पाट्य जहाराशु तच्चामन्यत वृत्रहा ।।

पारिजातहरणकथेचे रूप पूर्वोक्त प्राचीनतम हस्तलिखितात, महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीतील द्रोणपर्वात व क्षेमेन्द्राच्या भारतमञ्जरीत आढळत असल्यामुळे तेच प्राचीन होय असे डॉ. वैद्यांनी मानले आहे आणि हरिवंशाच्या आपल्या चिकित्सक आवृत्तीत दिले आहे.

याहून बरेच निराळे असे दुसरेही पारिजात-हरणकथेचे रूप हरिवंशाच्या छापील आवृत्तीत (चित्रशाळा प्रत, विष्णुपर्व, अध्याय ६५–७७) आले आहे. त्याकडे आता वळू.

कृष्ण एकदा आपल्या सर्व स्त्रीपुत्रांसह रैवतक (काठेवाडातील गिरनारजवळच्या) पर्वतावर रुक्मिणीच्या व्रतोद्यापनाकरिता गेला. तेथे तो सभेत रुक्मिणीसह बसला असता देवर्षि नारदाने त्याला स्वर्गीय पारिजातवृक्षाचे पुष्प दिले. कृष्णाने ते रुक्मिणीला अर्पण केले. तेव्हा ती अधिकच सुंदर दिसू लागली. नारदाने त्याबद्दल तिचे अभिनंदन करून म्हटले, 'हे पुष्प एक वर्षानंतर परत देवलोकात जाईल. हे दिव्य पुष्प कृष्णाने तुला दिले तेव्हा तू त्याचा दुसरा प्राणच आहेस हे मला समजले.' तेथे असलेल्या सत्यभामेच्या सेवकांनी हा वृत्तांत आपल्या स्वामिनीला निवेदन केला तेव्हा ती मत्सराने क्रुद्ध होऊन जळफळू लागली. कृष्णाला ते समजताच तो त्वरेने तिच्या महालात गेला. नानाप्रकारे तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण ती त्याला टाकून बोलली. तेव्हा कृष्ण म्हणाला, 'नारदाने दिलेले पारि-

१. हरिवंशाच्या छापील आवृत्तीत हरिवंशपर्व, विष्णुपर्व आणि भविष्यपर्व असे तीन भाग असून प्रत्येक भागातील अध्याय अलग मोजले आहेत. डॉ. वैद्यांच्या चिकित्सक आवृत्तीत या तीन पर्वांचा निर्देश असला तरी अध्याय आरंभापासून एकाच संख्येत दिले आहेत.

जातपुष्प मी रुक्मिणीला दिले खरे. या माझ्या अपराधाची क्षमा कर.

पारिजातकपुष्पाणि यदिच्छस्यतिकोपने ।
तदा दातास्मि सुश्रोणि सत्यमेतत् ब्रवीमि तम् ।
स्वर्गास्पदादानयित्वा पारिजातं द्रुमेश्वरम् ।
गृहे ते स्थापयिष्यामि यावत्कालं त्वमिच्छसि ।।

–( तुला जर पारिजाताची पुष्पे पाहिजे असतील तर मी तो वृक्षच स्वर्गातून आणून तुझ्या घरी लावतो. तुला पाहिजे तितका काळ तो तुझ्या येथे राहील. )

नंतर कृष्णाने नारदाला बोलावून त्याची पूजा केली. तेव्हा नारदाने सांगितले की 'कश्यपाने अदितीच्या अलंकाराकरिता आणि गीतनृत्यादि मनोरंजनार्थ पारिजातवृक्षाला निर्माण केले. अदितीने पुण्यप्राप्तीकरिता मला त्याचे दान केले आणि नंतर त्याचे मूल्य देऊन तो परत घेतला. तसेच इंद्राणी, चन्द्रपत्नी रोहिणी, कुबेरपत्नी ऋद्धि यांनीही केले.' नंतर नारद स्वर्गात जाऊ लागला तेव्हा कृष्णाने इंद्राला संदेश पाठवला की 'माझ्या पत्न्या पारिजाताचे दान करू इच्छितात. तेव्हा तो वृक्ष द्वारकेला पाठवा.' तेव्हा नारद म्हणाला, "कृष्णा, इंद्र तो वृक्ष देणार नाही समुद्रमन्थनाच्या प्रसंगी तो वृक्ष बाहेर आला. भगवान् शंकराने इंद्राच्या प्रार्थनेवरून शचीकरिता तो त्याला दिला. शंकर, पार्वती आणि मी याशिवाय कोणीही त्या उद्यानात प्रवेश करू शकत नाही. तेव्हा इंद्र तो वृक्ष तुला देणार नाही." तेव्हा कृष्ण म्हणाला, 'मी तो वृक्ष सत्यभामेला देण्याची प्रतिज्ञा केली आहे. तिचा भंग मी करणार नाही. माझ्या विनंतीवरून इंद्र तो न देईल तर मी गदेने त्याच्या वक्षःस्थलावर प्रहार करीन.'

नारदाने इंद्राला कृष्णाचा संदेश सांगितला. तेव्हा इंद्र म्हणाला 'महर्षे, माझा हा प्रतिसंदेश कृष्णाला सांगा, "आपण पृथ्वीचा भार हलका करण्याकरिता अवतार घेतला आहे. ते अवतारकृत्य पूर्ण झाल्यावर आपण स्वर्गात याल तेव्हा मी तो आपणास देईन. स्वर्गीय रत्ने मनुष्यलोकात क्षुद्र कारणाकरिता नेणे योग्य नाही." नारदाने त्याची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण इंद्र ऐकेना. तो म्हणाला-कृष्णाला सांगा

पलाशपत्रार्धमपि त्वयाऽजितो
न पारिजातस्य तव प्रदास्यति ।'

–( माझा पराजय केल्याशिवाय पारिजातकाचे अर्धे पानही तुम्हाला मी देणार नाही. ) नारदाने इंद्राचा संदेश कळविल्यावर कृष्ण म्हणाला, 'मी उद्याच इंद्राच्या अमरावतीवर हल्ला करीन. हे इंद्राला कळवा.'

नारदाने ते इंद्राला कळविताच इंद्राने बृहस्पतीला बोलावून त्याचा सल्ला विचारला. बृहस्पति म्हणाला, "इंद्रा, आपल्या पुत्रासह कृष्णाशी युद्ध कर. मीही या प्रश्नाची न्याय्य सोडवणूक व्हावी म्हणून प्रयत्न करतो. नंतर बृहस्पतीने तो वृत्तांत कश्यपाला सांगितला. कश्यपाने भगवान् शंकराकडे जाऊन त्यांना प्रसन्न करण्याकरिता प्रदीर्घ स्तुति केली ( विष्णुपर्व अध्याय ७२, श्लोक २९ ते ६० ) तेव्हा शंकर प्रसन्न होऊन म्हणाले, 'इंद्राने पूर्वी मुनिपत्नीचा अभिलाष केला त्याचे हे फळ. कृष्ण पारिजात घेऊन जाईलच. तुम्ही दाक्षायणी (अदिति) सह तिकडे जावे. इंद्र आणि कृष्ण यांच्यात पुढे सलोखा होईल."

नंतर कृष्णाने सात्यकीसह गरुडावर बसून इंद्राच्या नंदनवनावर स्वारी केली, प्रद्युम्नही त्याच्या मागून गेला. त्या वनातील रक्षकांसमक्ष कृष्णाने पारिजात वृक्ष उपटून गरुडावर घातला. तितक्यात इंद्राला ही बातमी लागून तो आपल्या जयंत पुत्रासह कृष्णावर चालून गेला. नंतर त्याचे कृष्णाशी आणि जयंताचे प्रद्युम्नाशी घनघोर युद्ध झाले. इंद्राचा मित्र आणि परशुरामाचा शिष्य प्रवर नामक ब्राह्मण पारिजातक हिसकावून घेऊ लागला तेव्हा सात्यकीने त्याचा प्रतिकार केला.

इंद्राने आपल्या वज्राने गरुडाचे एक एक पंख तोडण्यास आरंभ केला तेव्हा कृष्णाने प्रद्युम्नास द्वारकेस जाऊन दारुकसारथ्यासह आपला रथ आणण्यास सांगितले. नंतर कृष्ण त्या रथात बसून पारियात्र पर्वतावर ऐरावतारूढ इंद्र होता त्याच्याशी युद्ध करण्याकरिता गेला. प्रद्युम्न आणि सात्यकि हेही पारिजाताच्या रक्षणार्थ पारियात्र पर्वतावर गेले. तितक्यात संध्याकाळ झाली. म्हणून कृष्णाच्या सूचनेवरून इंद्राने युद्ध थांबवले. मग पुष्करक्षेत्राजवळ इंद्र जाऊन राहिला. नंतर तेथे ब्रह्मदेव, कश्यप, अदिति, अश्विनीकुमार, आदित्य, रुद्र वगैरे सर्व देव आले. कृष्णही प्रद्युम्न व सात्यकि यांसह पारियात्र












पर्वतावर राहिला. नंतर कृष्णाने ध्यान करताच गंगा तेथे आली. तिच्या जलाने स्नान करून कृष्णाने भगवान् शंकराची गंगोदक व बिल्वपत्र यांनी पूजा केली आणि त्याची स्तुति केली ( विष्णुपर्व, अध्याय ५४, श्लो. २२–३४) शंकरांनी प्रसन्न होऊन त्याला वर दिला. तेथील भगवान शंकराच्या देवालयाला 'बिल्वोदकेश्वर' असे नांव पडले. त्या रात्री कृष्ण तेथे राहिला. नंतर त्याने पर्वताला वर दिला की जे कोणी तुझ्यावर चढून माझे दर्शन घेतील त्यांना गोसहस्रदानाचे पुण्य मिळेल.

नंतर इंद्र व कृष्ण यांचे पुनः तुमुल युद्ध झाले. पुढे ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून कश्यप व अदिति तेथे आले. त्यांना पाहताच दोघांनीही युद्ध थांबवले. नंतर अदितीने म्हटले, 'कृष्णा, तू आता द्वारकेला हा पारिजात घेऊन जा. सत्यभामेचे पुण्यक व्रत संपल्यावर तू त्या वृक्षाची नंदनवनात पुनः स्थापना करावी.'

नंतर कृष्ण, प्रद्युम्न व सात्यकि यांच्यासह, द्वारकेला आला. तेथील सर्व नागरिकांनी त्या अद्भूत वृक्षाला पाहिले. नंतर कृष्णाने त्याची सत्यभामेच्या निवासस्थानी स्थापना केली. पुढे कृष्णाने ध्यान करताच नारदऋषि तेथे आले. सत्यभामेने कृष्णाला त्या वृक्षाला बांधून सुवर्ण, रत्ने इत्यादिकांसह नारदाला दान दिले. नंतर हसून नारद म्हणाले, मला याच्या बदली सवत्सकपिला गाय, कृष्णाजिन, तिळाने भरलेले पात्र व सुवर्ण द्या म्हणजे मी कृष्णाला परत देतो.[१] नंतर कृष्णाने पांडव, भीष्मक वगैरेंना तेथे बोलावून पारिजाताचे दर्शन करविले आणि एक वर्ष संपताच तो वृक्ष स्वर्गात नेऊन इंद्राला परत केला.[२] यानंतरच्या ७७ व्या अध्यायात पुण्यकव्रताचे वर्णन आले आहे.

हरिवंशाच्या छापील आवृत्तीतील पारिजातहरणाचे हे वर्णन अत्यंत पाल्हाळाचे असून पुराणातल्या सारखे आहे. त्याचा उद्देश पारियात्र गिरीवरील (अबूच्या पहाडावरील) बिल्वोदकेश्वर देवालय व नंदी आणि शेजारचे पुष्करतीर्थ यांचे माहात्म्य वर्णन करण्याचा दिसतो. ते एखाद्या सध्या अज्ञात असलेल्या पुराणातून घेतले असावे असे डॉ. वैद्यांनी म्हटले आहे.

पारिजातहरणाच्या या दोन वर्णनांत जमीनअस्मानाचे अंतर आहे, चिकित्सक आवृत्तीतील पारिजातहरणाचा वृत्तांत केवळ पाच श्लोकांत (अध्याय ९२, श्लो. ६३–६७) संपला आहे. तो अगदी साध्या नीरस पद्धतीने सांगितला आहे. याच्या उलट छापील आवृत्तीतील पारिजातहरणाच्या वृत्तांताने तेरा अध्याय (विष्णुपर्व, अध्याय ६४ ते ७६) (७५१ श्लोक) व्यापले आहेत. त्यात विप्रलंभ शृंगार, वीर, अद्भुत इत्यादि रसांचा परिपोष झाला आहे.

पारिजातहरणकथानकाला हे दुसरे रूप केव्हा प्राप्त झाले हे निश्चित करणारा पुरावा अलीकडे उपलब्ध झाला आहे. तो असा–

नवव्या शतकातील सुप्रसिद्ध साहित्यशास्त्रज्ञ आनंदवर्धन याने आपल्या ध्वन्यालोकात म्हटले आहे की 'कवीने एखादे ऐतिहासिक कथानक आपल्या काव्याचा विषय म्हणून पसंत केले असल्यास त्यातील इष्टरसविरोधी प्रसंग गाळून तद्रसपरिपोषक अशा काल्पनिक प्रसंगांची योजना करावी. कारण कवीला आपल्या काव्यामध्ये इतिहास शिकवावयाचा नसतो.'[३] याची उदाहरणे म्हणून कालिदासाच्या प्रबंधांचा आणि सर्वसेनाच्या हरिविजयाचा निर्देश आनंदवर्धनाने केला आहे. हरिविजयात वर्णिलेले मूळ ऐतिहासिक कथानक कोणते आणि त्यात सर्वसेनाने कोणते बदल केले हें आनंदवर्धनाने सांगितले नाही, पण ध्वन्यालोकाचा टीकाकार अभिनवगुप्त याने ती माहिती खालील शब्दात

१. यांच्याही पुढचे या कथेचे रूप पुढीलप्रमाणे आढळते. सत्यभामेला पारिजात वृक्ष दिल्यावर रुक्मिणी रागावली तेव्हा कृष्णाने तिची समजूत घातली की पारिजात वृक्ष सत्यभामेच्या अंगणात असला तरी त्याची फुले तुझ्या अंगणात पडतील! श्रीधरकृत मराठी हरिविजय अध्याय २६, ओव्या २०६–२०७.

२. महाराष्ट्रात ज्याला, पारिजात म्हणतात तो शेफालिका वृक्ष होय. स्वप्नवासवदत्तातील (अंक ४) त्याच्या पुष्पगुच्छांचे वर्णन पाहा: 'ते (शेफालिकागुल्मकाः) कुसुमिता नाम प्रवालान्तरितैरिव मौक्तिकलम्बकैराचिताः कुसुमैः।

३. 'इतिवृत्तवशायातां कथञ्चिद्रसाननुगुणां स्थितिं त्यक्त्वा पुनरुत्प्रेक्ष्याप्यन्तराभीष्टरसोचितकथोन्नयो विधेयः यथा कालिदासप्रबन्धेषु। यथा च सर्वसेनाविरचिते हरिविजये।' – ध्वन्यालोक, तृतीयोद्योत.












दिली आहे. तो म्हणतो 'हरिविजयातील पारिजात-हरणादि प्रसंग पत्नीच्या अनुनयाकरिता घातलेले[१] दिसतात, पण इतिहासावरून तसे दिसत नाही.' अभिनवगुप्ताचे हे विधान फार महत्वाचे आहे. त्यावरून सर्वसेनाच्या हरिविजयाचे कथानक कृष्णाने इंद्रावर स्वारी करून पारिजातवृक्ष पृथ्वीवर आणला त्या प्रसंगाविषयी असून कृष्णाने ते कृत्य पत्नीच्या अनुनयाकरिता केले होते ही माहिती मिळते. कृष्णाची ही पत्नी सत्यभामा होय यात संशय नाही. आनंदवर्धनाने हरिविजयातील काही प्राकृत गाथा उद्‌धृत केल्या आहेत. त्यावरून महाराष्ट्री प्राकृतातील त्या काव्याविषयी बरीच माहिती मिळते. धाराधिपति भोज (इ. स. च्या अकराव्या शतकाचा पूर्वार्ध) यानेही हरिविजयातून काही गाथा आपल्या सरस्वतीकण्ठाभरणात व शृंगारप्रकाशात घेतल्या आहेत. त्यापैकी खालील गाथा या संबंधात महत्वाची आहे.[२]

सुरकुसुमेहिं कलुसिअं जइ तेहिं चिअ
पुणो पसाएमि तुमं।
तो पेम्मस्स किसोअरि अवराहस्स
अ ण मे कअं अणुरूपं॥
[ सुरकुसुमैः कलुषितां यदि तैरेव पुनः
प्रसादयामि त्वाम्।
ततः प्रेम्णः कृशोदरि अपराधस्य च
न मे कृतमनुरूपम्॥ ]

भोजाने या गाथेचा संदर्भ दिला नाही. तथापि तिच्या अर्थाकडे लक्ष देता ती कृष्णाने सत्यभामेस उद्देशून म्हटली होती आणि हरिविजयातून घेतली होती हे उघड आहे. कृष्ण सत्यभामेस म्हणतो, "हे कृशोदरी सत्यभामे, मी रुक्मिणीला पारिजातपुष्पे दिली म्हणून तू रागावलीस. आता तुला प्रसन्न करण्याकरिता मी तीच पुष्पे तुला आणून दिली तर ते माझे कृत्य तुझ्यावरील माझ्या प्रेमाला आणि माझ्या अपराधाला साजेसे होणार नाही." म्हणून मी पारिजात वृक्षच तुझ्या अंगणात लावतो असा कृष्णाचा अभिप्राय दिसतो.

सर्वसेनाचे हरिविजय काव्य सध्या उपलब्ध नाही. तथापि आनंदवर्धन, भोज, अभिनवगुप्त, हेमचंद्र वगैरेंनी त्यातील अनेक गाथा आपल्या अलंकारविषयक ग्रंथांत उद्धृत केल्या आहेत किंवा त्यात वर्णिलेल्या विषयांचा निर्देश केला आहे त्यावरून त्या काव्याविषयी खालील माहिती मिळते–

हरिविजय हे काव्य आरंभापासून अखेरपर्यंत एकाच स्कन्धक नामक छंदात रचले होते. त्याच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटच्या गाथेत 'उत्साह' शब्द ग्रंथित केला होता. त्याचे कथानक सत्यभामेला प्रसन्न करण्याकरिता इंद्राचा पराजय करून कृष्णाने पारिजातवृक्ष स्वर्गातून पृथ्वीवर आणला असे होते. कृष्णाने प्रथम सात्यकीला आपला 'निसृष्टार्थ दूत (वाटाघाटीकरिता संपूर्ण अधिकार दिलेला प्रतिनिधि) म्हणून शिष्टाई करण्याकरिता इंद्राकडे पाठविले होते. पण इंद्र त्याचे ऐकेना म्हणून त्याने त्याच्यावर स्वारी केली. संस्कृत महाकाव्यातल्याप्रमाणे हरिविजयात नगरवर्णन, नायकवर्णन, वसंतऋतुवर्णन, सूर्यास्तवर्णन, वादनवर्णन इत्यादि विषय आले होते.

या काव्याचा काळ अनिश्चित होता. सर्वसेन आनंदवर्धनाच्या (म्हणजे खिस्तोत्तर नवव्या शतकाच्या) पूर्वी होऊन गेला हे ध्वन्यालोकांतून उद्‌धृत केलेल्या हरिविजयातील गाथांवरून स्पष्ट होते, पण त्याच्या काळाविषयी निश्चित माहिती नव्हती. सुमारे पंचवीस वर्षांपूर्वी आम्ही त्याचा काळ निश्चित केला.

सुप्रसिद्ध संस्कृत कवि दण्डी याचे अवन्तिसुन्दरीकथा नामक गद्यकाव्य सुमारे चाळीस वर्षांपूर्वी दक्षिणभारती-ग्रंथमालेत प्रसिद्ध झाले. त्याच्या आरंभी बाणाच्या हर्षचरितातल्याप्रमाणे प्राचीन कवींच्या स्तुतिपर काही श्लोक आहेत. त्यामध्ये सर्वसेनाविषयी खालील श्लोक आला आहे–

राज्ञा श्रीसर्वसेनेन ... ......।
...... ... ... विजयं हरेः॥

या ग्रंथाचे एकच हस्तलिखित प्राप्त झाले आहे व त्याचा पुष्कळ भाग किड्यांनी खाऊन टाकल्यामुळे

१. 'हरिविजये कान्तानुनयाङ्गत्वेन पारिजातहरणादि निरूपितमितिहासेष्वदृष्टमपि।' – ध्वन्यालोकलोचन, तृतीयोद्योत.

२. सरस्वतीकण्ठाभरण (निर्णयसागर प्रत, १९२५) पृ. ५६७.

वाचता येत नाही. वरील श्लोकाचाही बराच भाग त्याचकारणाने नष्ट झाला आहे. तथापि सुदैवाने त्यातील अत्यंत महत्वाचा भाग अवशिष्ट राहिला आहे. त्यावरून हरिविजय काव्य सर्वसेननामक राजाने रचले होते ही अन्यत्र दुष्प्राप्य अशी माहिती मिळते. या पद्यमय प्रस्तावनेतील इतर कविप्रशंसापर श्लोकांचे निरीक्षण केल्यास ते त्या कवींच्या कालक्रमानुसार घातले आहेत असे ध्यानात येते. सर्वसेनाच्या स्तुतिपर श्लोक भासाच्या प्रशंसेनंतर आणि कालिदासाच्या स्तुतीच्या पूर्वी आला आहे. त्यावरून सर्वसेन हा भासानंतर आणि कालिदासापूर्वी होऊन गेला असे दिसते.

सुमारे तीस वर्षांपूर्वी पर्यंत सर्वसेन नामक राजा सर्वस्वी अज्ञात होता. सन १९३९ मध्ये विदर्भाच्या अकोला जिल्ह्यातील वाशीम (पूर्वीचे वत्सगुल्म) येथे वाकाटकांचा एक ताम्रपट सापडला होता. तो आम्ही नंतर एपिग्राफिया इंडिका ( व्हॉ. २६, पृ. १३९ इत्यादि ) मध्ये प्रसिद्ध केला आहे. त्यावरून सर्वसेन हा महाप्रतापी वाकाटक सम्राट पहिला प्रवरसेन (सन २७०–३३० ) याचा पुत्र असून वत्सगुल्म शाखेचा संस्थापक होता ही माहिती मिळाली. अजंठ्याच्या सोळा नंबरच्या लेण्यांतही त्याचे नाव आले होते, पण तो लेख फार खराब झाल्याने त्या लेखाचे पूर्वीचे संपादक भाऊ दाजी, भगवानलाल इंद्रजी आणि बुल्हर यांना त्याचे नाव वाचता आले नव्हते. तोही लेख आम्हीं इतरत्र संपादिला असून त्यात सर्वसेनाचे नाव कोठे आले होते हे दाखविले आहे. भारताच्या प्राचीन इतिहासात सर्वसेन नावाचा एकच राजा ज्ञात आहे. तो वाकाटक वंशातला असून सन ३३० ते ३५५ या कालात होऊन गेला असे आता निश्चित झाले आहे.

आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकातील पूर्वोक्त विधानावरून पारिजातहरणाची कथा आरंभी हरिवंशाच्या चिकित्सक आवृत्तीतल्याप्रमाणे अगदी साधीसुधी होती असे दिसते. सर्वसेनाने तिला आपल्या काव्याचा विषय करताना तीत बराच कल्पनेचा मालमसाला घालून सजविले होते. सर्वसेनाचे काव्य माहाराष्ट्री प्राकृत मध्ये होते. त्यानंतर अकराव्या शतकापर्यंत हरिवंशांतील पारिजातहरण कथेत काही बदल झाला नव्हता हे त्या काळी रचलेल्या क्षेमेन्द्राच्या भारतमञ्जरीवरून स्पष्ट दिसते.[1] नंतर मात्र कोणा कवीने सर्वसेनाच्या हरिविजयातल्यासारखे तिला रूप दिले. कृष्णाने पारिजात आणण्याकरिता स्वारी केली ती रुसलेल्या सत्यभामेला प्रसन्न करण्याकरिता असे दाखविण्यात आले. काही ठिकाणी बदलही करण्यात आला. हरिविजयात कृष्णाने पारिजात देण्याकरिता शिष्टाई करण्यासाठी सात्यकीला पाठविले असे सर्वसेनाने कल्पिले होते तर हरिवंशात त्या कथेचे विस्तृत रूप प्रक्षिप्त करणाऱ्या कवीने शिष्टाईची कामगिरी नारदावरच सोपविली होती. इतरही काही फेरफार त्याने केले असावे. तथापि हरिविजयावरूनच पारिजातहरणाच्या विस्तृत आणि रसयुक्त वर्णनाची कल्पना त्याला सुचली असावी हे स्पष्ट आहे.[2]

सर्वसेनाच्या काळापर्यंत ( सन ३३० पर्यंत ) हरिवंशातील पारिजातहरणाचे स्वरूप चिकित्सक आवृत्तीतल्याप्रमाणे साधेसुधे होते. त्याकाळी महाभारतात हरिवंशाचा अंतर्भाव होत होता हे मागे दाखविले आहे. तेव्हा महाभारत आणि हरिवंश यांना चिकित्सक आवृत्तीतला आकार त्यापूर्वी निदान शंभर दीडशे वर्षे अगोदर आला असावा असे अनुमान करता येते. **तेव्हा मूळ हरिवंशाला चिकित्सक आवृत्तीतील रूप निदान सन २०० पूर्वी आले असले पाहिजे** त्या मागे ही मर्यादा किती जाते हे सांगणे सध्याच्या परिस्थितीत अशक्य आहे.

---

१. भागवतपुराणातही (दशमस्कंध, अध्याय ५९, श्लोक ३९–४० ) हेच पारिजातकथेचे साधे रूप आढळते. त्या पुराणाचा काळ सुमारे दहावे शतक असा डॉ. विंटरनिट्झने मानला आहे.

२. कालिदासाच्या अभिज्ञानशाकुंतलाचे अनुकरण पद्मपुराणात आणि कुमारसंभवाचे शिवपुराणात केलेले आम्ही इतरत्र दाखविले आहे. पाहा : ' कालिदास, ' पृ. ११५ आणि २०३.







श्री. अद्वयानंद गळतगे

# लिंगभेद आणि उत्क्रांति – ९

मागच्या लेखात तीन प्रकारचे लैंगिक दोष सांगितले आहेत. हे तीन प्रकारचे लैंगिक दोष म्हणजे (१) रंगसूत्री लैंगिक दोष. (२) आनुवंशिक लैंगिक दोष, (३) शरीरशास्त्रीय लैंगिक दोष. मागच्या लेखात पहिल्या दोन प्रकारच्या लैंगिक दोषांचा विचार केला आहे. येथे तिसऱ्या प्रकारच्या लैंगिक दोषांचा विचार करावयाचा आहे.

## ३. शरीरशास्त्रीय लैंगिक दोष

(Physiological disorders of sex)

पहिल्या दोन प्रकारच्या लैंगिक दोषांच्या मानाने शरीरशास्त्रीय लैंगिक दोष किरकोळ असून ते स्त्रियातच आढळून येतात. हे दोष अड्रेनल ग्रंथी व स्त्रीबीजकोश (ovary) यावरील गाठीमुळे निर्माण होतात. अड्रेनल ग्रंथीवर निर्माण होणाऱ्या गाठी सौम्य किंवा विषारी असू शकतील. त्याचप्रमाणे स्त्रीबीजकोशावरील गाठींचेही आहे. स्त्रीबीजकोशावरील गाठींचे अनेक, प्रकार आहेत. उदा. अरेनोब्लास्टोमा, हिलस सेल ट्यूमर अड्रेनल रेस्ट ट्यूमर, जिनॅन्ड्रोब्लास्टोमा इत्यादि. पुष्कळ वेळा स्त्रीबीजकोशांची अतिरिक्त वाढ होते. अशा स्त्रीबीजकोशांना पॉलीसिस्टिक ओव्हरी म्हणतात. पॉलीसिस्टिक ओव्हरीमुळे स्टीन-लेव्हेन्थॉलची रोगलक्षणे (Stein Leventhal Syndrome) निर्माण होतात. हे सर्व रोग किंवा दोष स्त्रीत कमी-जास्त प्रमाणात पुरुषलक्षणे निर्माण करीत असल्यामुळे ते निर्माण करणाऱ्या गाठींना पुरुषीकरणाच्या गाठी (virilizing tumours) असेही म्हणतात. स्त्रीत अड्रेनल ग्रंथीवरील व स्त्रीबीजकोशातील गाठीमुळे पुरुषीकरणाची लक्षणे निर्माण होण्यास ज्या गोष्टी कारणीभूत होतात त्या समजावून घेण्यासाठी अड्रेनल ग्रंथी व स्त्रीबीजकोश यांच्या कार्यांची थोडी माहिती घेणे अवश्य आहे.

अड्रेनल ग्रंथी दोन्ही मूत्रपिंडावर साधारणपणे त्रिकोणाकृतीप्रमाणे बसलेल्या असून त्या दोन इंच लांब व ½ इंच रुंदीच्या असतात. या ग्रंथी शारीरिक आणीबाणीच्या प्रसंगी किंवा संकटकाळी बिघडलेला शरीरांतर्गत तोल सांभाळण्याचे अत्यंत महत्त्वाचे कार्य करतात. परिणामी या ग्रंथींच्या अभावी कोणत्याही विषम परिस्थितीला तोंड देणे प्राण्याना शक्य होत नाही. याशिवाय स्नायूतील कार्बोहायड्रेटचा वापर या ग्रंथींच्या नियंत्रणाखाली चालतो. या ग्रंथीपासून स्टिरॉयड् नामक रसायने तयार होत असून त्यामध्ये हायड्रोकॉर्टिझोन (कॉर्टीझोल) व कॉर्टिकोस्टेरॉन हे प्रमुख आहेत. ही रसायने असीटेट व कोलेस्टेरॉल या रसायनापासून निर्माण होतात.[१] या रासायनिक प्रक्रियेत प्रोजेस्टेरोन हे गर्भवाढीस सहाय करणारे हॉर्मोन, स्त्री-हॉर्मोन व डीहायड्रोएपिॲन्ड्रोस्टेरोन (D H A) हे पुरुष हॉर्मोन तयार होतात. शिवाय प्रोजेस्टेरोन या गर्भ-हॉर्मोनपासूनही अन्ड्रोस्टेरोनसारखे पुरुष हॉर्मोन तयार होतात. अशारीतीने **स्त्रीच्या अड्रेनल ग्रंथीमधील मूलभूत रासायनिक प्रक्रियांचा परिणाम म्हणून स्त्रीच्या शरीरात पुरुष हॉर्मोन तयार होतात.** मागच्या लेखात आपण पाहिल्याचे वाचकांना आठवत असेल की मिथ्या-द्विलिंगी स्त्रीमध्ये पुरुष लक्षणे निर्माण करण्यास जो आनुवंशिक दोष कारणीभूत ठरतो त्या दोषामुळे १७-हायड्रॉक्झीप्रोजेस्टेरोन या द्रव्याचे हायड्रोकॉर्टिझोनमध्ये रूपांतर होत नाही. परिणामी १७-हायड्रॉक्झीप्रोजेस्टेरोनचे अन्ड्रोस्टेरोन या पुरुष हॉर्मोनमध्ये पर्यायी रूपांतर होते. वर म्हटल्याप्रमाणे अन्ड्रोस्टेरोन व डीहायड्रोएपिॲन्ड्रोस्टेरोन (DHA) ही पुरुष हॉर्मोन्स अड्रेनल ग्रंथीतील नेहमीच्या रासायनिक प्रक्रियांचा परिणाम म्हणून तयार होतात. पण त्यांचे प्रमाण मर्यादित असल्यामुळे त्यापासून विशेष परिणाम होत नाही. पण उपर्युक्त आनुवंशिक दोषामुळे किंवा अड्रेनल ग्रंथीतील ट्यूमरमुळे या ग्रंथीपासून अतिरिक्त पुरुष हॉर्मोन्स निर्माण होतात (Hyperadrenalism); आणि त्याचे दृश्य परिणाम म्हणून स्त्रीचे पुरुषीकरण होते. कशिंगच्या रोगलक्षणामध्येसुद्धा (Cushing Syndrome) भिंती जाड करून रक्तदाबाचा विकार निर्माण

१. कोलेस्टेरॉल हे रसायन रक्तवाहिन्यांच्या करण्याबद्दल प्रसिद्ध आहे.








अड्रेनल ग्रंथीपासून अतिरिक्त हॉर्मोन्स तयार होतात. पण यात पुरुष हॉर्मोनपेक्षा हायड्रोकॉर्टिझोनचे ( कॉर्टिझोलचे ) प्रमाण जास्त असते; आणि तेच कशिंगच्या रोगाला कारणीभूत ठरते. तथापि काही प्रमाणात पुरुष हॉर्मोनही तयार होत असल्यामुळे कशिंगच्या रोगलक्षणातही स्त्रीचे अल्पांशाने पुरुषीकरण होते. उदा. अशा स्त्रीच्या शरीरावर नको त्या ठिकाणी केस उगवतात, ( उदा. दाढी, मिशा ) व क्वचित् योनिलिंगही वृद्धि पावते.

अड्रेनल ग्रंथीचे पुरुष हॉर्मोन तयार करण्याचे हे कार्य प्रौढ वयातच चालू होते असे समजू नये. स्त्रीपुरुष वयात येण्यापूर्वी त्याना होणारा लैंगिक हॉर्मोन्सचा पुरवठा मुख्यतः या अड्रेनल ग्रंथीमार्फतच होतो. किंबहुना गर्भावस्थेत या अड्रेनल ग्रंथीवर विशेष जबाबदारी असावी असे दिसते. कारण गर्भावस्थेत अड्रेनल ग्रंथी प्रौढावस्थेपेक्षा फारच मोठ्या असून 'फीटल कॉर्टेक्स' हा एक विशेष अवयव त्यांच्यात वाढतो. हा अवयव मानव व मानवसदृश माकड याखेरीज इतर सस्तन प्राण्यात आढळून येत नाही हे विशेष होय. मूल जन्मल्यानंतर हा अवयव नाहीसा होतो हा त्याचा दुसरा विशेष होय. ही गोष्ट हा अवयव अधिक उत्क्रांत अवस्थेचा द्योतक असल्याचे व गर्भावस्थेत तो महत्त्वाचे कार्य करीत असल्याचे दर्शविते. प्रत्येक गर्भामध्ये– मग तो गर्भ पुल्लिंगी असो वा स्त्रीलिंगी असो– पुरुष हॉर्मोन भरपूर प्रमाणात आढळून येत असून या पुरुष हॉर्मोनचा पुरवठा या 'फीटल कॉर्टेक्स' पासूनच होत असल्याचे आढळून येते. मूल जन्मल्यानंतर त्याच्यातील या हॉर्मोनचे प्रमाण कमी होते. यावरून गर्भाच्या वाढीला– मग तो गर्भ पुल्लिंगी असो वा स्त्रीलिंगी असो– पुरुष हॉर्मोनची मदत होत असावी असा तर्क करावयास हरकत नाही. या अवयवाचा व मेंदूच्या विकासाचा संबंध असावा असे दिसते. कारण मेंदूचे जन्मजात दोष असलेल्या मुलात हा अवयव खुरटलेला आढळून येतो. अशारीतीने उत्क्रांतीमध्ये पुरुष हॉर्मोन्सना व अड्रेनल कॉर्टेक्सला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

अड्रेनल ग्रंथीपासून लैंगिक हॉर्मोन्स तयार होत असले तरी या हॉर्मोन्सचा मुख्य पुरवठा लैंगिक ग्रंथी- ( gonads ) पासूनच होतो. स्त्रीबीजकोशापासून स्त्री हॉर्मोन्स निर्माण होतात व त्यांच्या मार्फत स्त्रीत्वाची लक्षणे निर्माण होतात. तथापि **निरोगी स्त्रीच्या स्त्रीबीजकोशापासून स्त्री-हॉर्मोन्सप्रमाणे पुरुष हॉर्मोन्सही तयार होतात** असे आढळून येते. अड्रेनल ग्रंथी व स्त्रीबीजकोश यांचे पुरुष व स्त्री-हॉर्मोन्स निर्माण करण्याचे रासायनिक मार्ग कमीजास्त प्रमाणात सारखेच आढळून येतात. हा मार्ग असा :– कोलेस्टेरॉल —> प्रोजेस्टेरोन—> १७ – हायड्रॉक्झीप्रोजेस्टेरोन —> अन्ड्रोस्टेनोडायोन ( पुरुष हॉर्मोन ). दुसराही एक मार्ग आढळून येतो; तो असा :– कोलेस्टेरॉल —> प्रिग्नेनोलोन १७ – हायड्रॉक्झीप्रिग्नेनोलोन —> डिहायड्रोएपिॲन्ड्रोस्टेरोन ( DHA ). ( पुरुष–हॉर्मोन ). अन्ड्रोस्टेनोडायोन व DHA ही सौम्य पुरुष हॉर्मोन्स आहेत. पुरुषात पुरुषबीजकोश ( testis ) पासून निर्माण होणारे टेस्टोस्टेरोन हे पुरुष हॉर्मोन अत्यंत प्रभावी असून तेसुद्धा स्त्रीबीजकोशात निर्माण होत असल्याचे सजीव व निर्जीव स्त्रीबीजकोशावरील प्रयोगावरून आढळून आले आहे. हे हॉर्मोन तयार होण्याचा मार्ग असा :– कोलेस्टेरॉल—> प्रोजेस्टेरोन—> टेस्टोस्टेरोन असिटेट—> टेस्टोस्टेरोन. यात लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट एवढीच की वरील सर्व प्रकारच्या पुरुष हॉर्मोन्सचे प्रमाण निरोगी स्त्रीत मर्यादित स्वरूपात असते व ते कोलेस्टेरॉलपासून स्त्री-हॉर्मोन्स तयार करताना मधला टप्पा म्हणून अपरिहार्यपणे तयार होतात. याचाच अर्थ असा की या पुरुष हॉर्मोनपासून पुढे स्त्री हॉर्मोन्स तयार होतात. उदा. टेस्टोस्टेरोनपासून ईस्ट्रोन व अन्ड्रोस्टेनोडायोनपासून ईस्ट्रोन व ईस्ट्रॅडायोल ही स्त्रीहॉर्मोन्स तयार होतात. पुरुष हॉर्मोनची निर्मिति स्त्रीहॉर्मोनच्या निर्मितीमधील मधला टप्पा असून स्त्रीहॉर्मोनच्या निर्मितीमधील शेवटच्या टप्प्याला बगल दिल्याने पुरुष हॉर्मोन्स विपुल प्रमाणात निर्माण होतात. ही गोष्ट लैंगिक रंगसूत्रांच्या (sex chromosomes) उत्क्रांतीच्या दृष्टीने अर्थपूर्ण आहे. कारण मादीपासून नराची कशी निर्मिति होऊ शकते या गोष्टीची जीवरासायनिक पातळीवरची उपपत्ति त्यामुळे लागते. ही गोष्ट पुढील आकृतीवरून स्पष्ट होईल :




**आकृती** १. X या स्त्रीलिंगनिर्णायक रंगसूत्रापासून Y या पुल्लिंगनिर्णायक रंगसूत्राची उत्क्रांति रासायनिक पातळीवर कशी झाली असावी हे दर्शविणारी आकृति. ॲन्ड्रोस्टेनोडायोन या पुरुष हॉर्मोनचे ईस्ट्रोन या स्त्री हॉर्मोनमध्ये रूपांतर करणाऱ्या एंझाईमची निर्मिति काही कारणाने झाली नाही तर मादीपासून नर निर्माण होईल.

या आकृतीवरून हे स्पष्ट होईल की अन्ड्रोस्टेनोडायोन या पुरुष हॉर्मोनचे ईस्ट्रोन या स्त्रीहॉर्मोन मध्ये रूपांतर करणाऱ्या एंझाईमची निर्मिति काही कारणाने झाली नाही तर मादीचे नरामध्ये रूपांतर होईल. आणि हा एंझाईम दोष आनुवंशिक असेल तर नर निर्मितीची यंत्रणा आनुवंशिक बनेल. ही आनुवंशिक यंत्रणा उत्क्रांतीच्या प्रक्रियेत रंगसूत्रात दृश्य फरक निर्माण करण्यास व अशारीतीने लैंगिक रंगसूत्रांच्या उत्क्रांतीस कारणीभूत होणे अशक्य नाही.

निरोगी स्त्रीबीजकोशात पुरुष हॉर्मोन निर्माण होत असल्यामुळे स्त्रीला पुरुष हॉर्मोनची शारीरिक गरज असावी असे वाटणे स्वाभाविक आहे. पण ही गरज कोणती हे अजून माहीत झालेले नाही. किंबहुना स्त्रीच्या शरीरात पुरुष हॉर्मोनचे काहीच कार्य नाही असे मत प्रचलित दिसते. Endocrinology of Woman या ग्रंथात हॅब्लेन हा शास्त्रज्ञ म्हणतो की, " No physiological genital role of androgens in the female has been described and none seems likely. It seems likely that gynecic functions occur despite woman's androgen moiety rather than by virtue of it. " ( P. 49. ) म्हणजे स्त्रीच्या लैंगिक व शरीरशास्त्रीय कार्यासाठी पुरुष हॉर्मोन्स उपकारक नसून अडचणीची आहेत. तरीसुद्धा ती स्त्रीच्या शरीरात निर्माण होतात व क्वचित् विपुल प्रमाणात निर्माण होतात हे पाहिले तर लिंगभेदाच्या उत्क्रांतीच्या प्रक्रियेमध्ये एकेकाळी ( द्विलिंगी अवस्थेत ) ती उपयुक्त होती पण आता ती अवशेष रूपाने ( vestiges ) राहिली आहेत असे म्हणणे भाग आहे. वर म्हटल्याप्रमाणे अजूनही गर्भावस्थेत पुरुष हॉर्मोन विपुल प्रमाणात आढळत असल्यामुळे ( गर्भावस्थेत उत्क्रांतीच्या प्रारंभिक अवस्थेतील अवशिष्ट अवयव गर्भाच्या विकासाचा एक अपरिहार्य भाग म्हणून आढळून येतात त्याप्रमाणे ) ती गर्भाच्या विकासाचा एक अपरिहार्य भाग म्हणून व प्रौढावस्थेत अवशिष्ट भाग म्हणून आढळून येतात असे म्हणता येईल. पण मानवी आंत्रपुच्छा ( appendix ) प्रमाणे ( आंत्रपुच्छ हाही अवशिष्ट अवयव आहे. ) हे अवशिष्ट भाग कधीकधी स्त्रीला इतके तापदायक होतात की आंत्रपुच्छ जसे शस्त्रक्रियेने कापून काढावे लागते तसे हा अवशिष्ट भागही नाहीसा करण्यासाठी शस्त्रक्रिया करण्याशिवाय गत्यंतर उरत नाही. कारण अड्रेनल ग्रंथीत व स्त्रीबीजकोशात











क्वचित् गाठी निर्माण होतात व त्यापासून पुरुष हॉर्मोनची प्रमाणाबाहेर निर्मिति होते. याचा परिणाम म्हणून स्त्रीचे पुरुषीकरण होते. ही पुरुष लक्षणे नाहीशी करण्यासाठी या गाठी शस्त्रक्रियेने कापून काढण्याशिवाय गत्यंतर उरत नाही.

## स्त्रीबीजकोशावरील गाठी आणि स्त्रीचे पुरुषीकरण

मागच्या लेखात गर्भाची वाढ कशी होते हे पाहताना स्त्रीलिंगी गर्भात काही पुरुष अवयव (वुल्फियन नलिका) अवशेषरूपाने अस्तित्वात असतात हे आपण पाहिले आहे. हे अवशिष्ट अवयवच (fetal rests) पुढे स्त्रीबीजकोशावरील पुरुषीकरणाच्या गाठीच्या ( Virilizing tumours ) रूपात वाढत असावेत अशी कल्पना आहे. या गाठी केवळ पुरुष हॉर्मोनच जास्त प्रमाणात निर्माण करतात असे नाही, तर स्त्रीहॉर्मोनही निर्माण करतात. या दोन्ही हॉर्मोन्सपैकी कोणत्या हॉर्मोन्सचे प्रमाण जास्त असते त्या हॉर्मोन्सचे बाह्य परिणाम दिसून येतात. पुरुष हॉर्मोनची निर्मिति करणाऱ्या गाठीत पुरुषबीजकोशात आढळतात तशा Leydig Cells नावाच्या पेशी आढळतात हे मात्र उल्लेखनीय आहे.

स्त्रीबीजकोशावर अगदी सामान्यपणे आढळणाऱ्या गाठी म्हणजे अरेनोब्लास्टोमा ( Arrhenoblastoma ) होत. या गाठीत नेहमीच Leydig च्या पेशी असतात असे नाही. पण जेथे असतात तेथे पुरुषीकरणाची लक्षणे स्पष्टपणे व हमखास दिसून येतात. ही लक्षणे दोन अवस्थात निर्माण होतात. पहिल्या अवस्थेत स्त्रीत्वाची लक्षणे नाहीशी होतात. उदा. मासिक पाळी नाहीशी होते व स्तन खुरटतात. दुसऱ्या अवस्थेत पुरुषत्वाची लक्षणे निर्माण होतात. उदा. पुरुषाप्रमाणे स्त्रीच्या शरीराच्या निरनिराळ्या भागावर ( चेहरा, हात, पाय, स्तन, पाठ इ. अवयवांवर ) केस उगवतात ( hirsutism ); योनिलिंग वृद्धि पावते, कामवासना वाढते, आवाज बदलतो, अस्थि-स्नायू वाढतात. १४ वर्षांची एक मुलगी बेसबॉलच्या खेळात बॅटिंगमध्ये मुलांनाही वरचढ ठरल्यामुळे संशय येऊन तिची वैद्यकीय तपासणी करण्यात आली तेव्हा तिच्या स्त्रीबीजकोशावर अरेनोब्लास्टोमाच्या गाठी आढळून आल्या ! या गाठी शस्त्रक्रियेने काढून टाकल्यानंतर तिच्या बॅटिंगचे प्रमाण इतर मुलींच्या पातळीवर उतरले.

स्त्रीबीजकोशावर क्वचित् अड्रेनल रेस्ट ट्यूमरही आढळून येते. अड्रेनल ग्रंथीसारख्या पेशी स्त्रीबीजकोशात निर्माण होऊन अरेनोब्लास्टोमाप्रमाणेच पुरुषीकरणाची लक्षणे निर्माण करतात. पुरुषीकरणाची लक्षणे हमखास निर्माण करणाऱ्या आणखी एका प्रकारच्या गाठी म्हणजे हिलस सेलच्या गाठी ( Hilus cell tumour ) होत. या गाठी प्रौढपणी व मध्यम वयानंतरच्या स्त्रियात जास्त प्रमाणात आढळतात. या गाठीमुळे मासिक पाळी बंद होणे, शरीरावर केस उगवणे, योनिलिंग वृद्धि पावणे इ. लक्षणे निर्माण होतात. या गाठी कापून काढताच ही लक्षणे नाहीशी होतात.

स्त्रीबीजकोशावरील गाठीप्रमाणेच पॉलीसिस्टिक ओव्हरीमुळेही क्वचित् वरीलप्रमाणे पुरुषी लक्षणे निर्माण होतात. पण ती सौम्य असतात. (या दोषाला Stein– Leventhal Syndrome म्हणतात.) या दोषात स्त्रीबीजकोशाची अतिरिक्त वाढ झालेली असते. ही अतिरिक्त वाढ कापून काढून हा दोष तात्पुरता कमी करता येतो. मुख्य दोष एंझाईममध्ये असल्याचा आढळून आला आहे. या एंझाईम दोषामुळे पॉलीसिस्टिक ओव्हरीमध्ये जमलेल्या ॲन्ड्रोस्टेनोडायोन व DHA या सौम्य पुरुष हॉर्मोन्सचे रूपांतर टेस्टोस्टेरोन या प्रबळ पुरुष हॉर्मोनमध्ये होते व केसाळपणा (hirsutism), योनिलिंग वृद्धि पावणे इत्यादि पुरुष लक्षणे निर्माण होतात.

वर उल्लेख केल्याप्रमाणे कशिंगच्या रोगलक्षणातही ( Cushing Syndrome ) पुरुष लक्षणे निर्माण होतात. पण ती केसाळपणापुरतीच मर्यादित असतात. ( ७२ टक्के रोग्यात ही लक्षणे दिसून येतात.) कशिंगचा दोष अड्रेनल ग्रंथींनी हायड्रोकॉर्टिझोन (कॉर्टिझोल) जास्त प्रमाणात निर्माण केल्यामुळे निर्माण होतो. स्त्रीबीजकोशातील वर वर्णिलेल्या सर्व तऱ्हेच्या गाठीपासून स्त्रीबीजनिर्मिति ( ovulation ) होत नसल्यामुळे स्त्रीत वांझपणा येतो.








## अड्रेनल ग्रंथीवरील पुरुषीकरणाच्या गाठी

मागच्या लेखात अड्रेनल ग्रंथीच्या लैंगिक रोगलक्षणात (adrenogenital syndrome) मिथ्या-द्विलिंगी स्त्री आनुवंशिक कारणामुळे निर्माण होते असे म्हटले आहे. हा आनुवंशिक दोष अनेड्रल ग्रंथीमध्ये विशिष्ट एंझाईमच्या अभावी अतिरिक्त पुरुष हॉर्मोन तयार झाल्यामुळे (adrenal hyperplasia) निर्माण होतो असे म्हटले आहे. हा दोष आनुवंशिक असल्याने तो गर्भावस्थेत किंवा अगदी बाल्यावस्थेत दृग्गोचर होतो. अड्रेनल ग्रंथीवरील गाठीमुळे (adrenal neoplasia) मात्र सामान्यतः प्रौढपणीच पुरुषीकरणाच्या लक्षणांचा दोष निर्माण होतो. तथापि याला अपवादही आढळून येतात. कारण लहान वयातही या गाठींचे अस्तित्व अधूनमधून निदर्शनास येते. एका दोन वर्षांच्या मुलीचे योनिलिंग वाढल्याचे व काखेत व योनिभागावर केस उगवल्याचे आढळून आले. तिची वैद्यकीय तपासणी केली असता तिच्या उजव्या अड्रेनल ग्रंथीवर लहान गाठ आढळून आली. या मुलीचे खरे वय दोन वर्षे असले तरी हाडांच्या वाढीवरून काढावयाचे वय चार वर्षांचे भरले. पुरुष हॉर्मोनमुळे हाडांचीच वाढ झपाट्याने होते असे नाही तर उंचीही वाढते. किंवा हाडांच्या वाढीमुळेच उंची वाढते असे म्हणता येईल.) कारण या मुलीची उंची त्याच वयाच्या मुलींच्या सरासरी उंचीपेक्षा कितीतरी अधिक भरली. अड्रेनल ग्रंथीवरील गाठीमुळे तारुण्यात व प्रौढपणी कमीजास्त प्रमाणात व दिसून येण्याइतक्या मिशा व दाढी वाढतात व काखेत व योनि-भागावर अतिरिक्त केस वाढतात (hyper trichosis); व त्यांचा आकार स्त्रीविशिष्ट त्रिकोणाप्रमाणे न बनता पुरुषाच्या जननेंद्रियावरील केसाप्रमाणे पोटाकडे वाढत जातो. कधीकधी हातावर व पायावरही पुरुषाप्रमाणे केस वाढतात (hirsutism), व डोक्याला कपाळाच्या बाजूने टक्कल पडते (cephalic alopecia), आवाज पुरुषी बनतो. वयात आलेल्या मुलीत मासिक पाळी सुरू होत नाही, व प्रौढ वा तरुण स्त्रीत चालू असलेली पाळी बंद होते. तरुण मुलीत स्तन वाढत नाहीत, व प्रौढ स्त्रियात वाढलेले स्तन खुरटतात; योनिलिंग सर्व स्त्रियात हमखास वृद्धि पावते, व बहुसंख्य स्त्रियांत कामवासना वाढते.[१] शरीराची अतिरिक्त वाढ होते व स्नायूंची व हाडांची वाढ झाल्यामुळे शरीर पुरुषासारखे बनते– खांदे रुंद होतात व नितंब अरुंद बनतात. वरील सर्व लक्षणे त्या त्या व्यक्तीच्या शरीरघटनेनुसार व तिच्यात निर्माण होणाऱ्या पुरुष हॉर्मोनच्या प्रमाणानुसार कमी जास्त प्रमाणात दिसून येतात. ही लक्षणे निर्माण करणारे पुरुष हॉर्मोन म्हणजे DHA होय. कारण अड्रेनल ग्रंथीवरील गाठीमुळे DHA (डीहायड्रो-एपिॲन्ड्रोस्टेरोन) हे पुरुष हॉर्मोन अधिक प्रमाणात निर्माण होत असल्याचे आढळून आले आहे.[२]

स्त्रीबीजकोश व अड्रेनल ग्रंथी यावरील गाठीपासून स्त्रीत निर्माण होणाऱ्या पुरुष लक्षणामुळे पुरुषांची (किंवा पुरुष हॉर्मोनमुळे निर्माण होणारी) व्यवच्छेदक लक्षणे कोणती याची चांगली कल्पना येते. पुरुष हॉर्मोनमुळे स्नायूंची वाढ होते व अस्थींची वाढ जास्त प्रमाणात होते. परिणामी उंची वाढते. ही गोष्ट XO रंगसूत्रव्यवस्था असलेल्या (म्हणजे टर्नरची रोगलक्षणे असलेल्या) व्यक्ती–म्हणजे अविकसित स्त्रिया–नेहमी अत्यंत ठेंगण्या असतात या वस्तुस्थितीवरूनही स्पष्ट होईल. XO अवस्थेमध्ये पुल्लिंगनिर्धारक Y रंगसूत्र नसल्यामुळे पुरुष हॉर्मोनचा मोठाच अभाव निर्माण होत असला पाहिजे व त्याचा परिणाम म्हणून

---

१. कामवासना ही केवळ शरीरघटनेवर अवलंबून नसून मनोघटनेवरही अवलंबून असल्यामुळे तिचा प्रादुर्भाव निरनिराळ्या स्त्रियांत निरनिराळ्या रीतीने व कमीजास्त प्रमाणात होणे शक्य आहे. हॉर्मोनला शरीर किती प्रतिसाद (response) देते (हे अनुवंशाने ठरते) यावरही कामवासनेची तीव्रता अवलंबून आहे. पुरुष हॉर्मोनमुळे निरनिराळ्या स्त्रियात पुरुष लक्षणांचा प्रादुर्भाव कमीजास्त होण्याचेही हेच कारण आहे. वृद्ध स्त्रियात या दोषामुळे कामवासना वाढत नाही असे जे आढळून येते, त्याचे कारण स्पष्ट आहे.

२. पुरुषात सुद्धा टेस्टोस्टेरोन या अत्यंत प्रभावी पुरुष हॉर्मोनपेक्षा DHA या पुरुष हॉर्मोनचे प्रमाण जास्त आढळून येते.



अनुक्रमणिका






या व्यक्ति ठेंगण्या बनत असाव्यात हे स्पष्ट आहे. शरीरावरील केसांची वाढ हे खास पुरुषी लक्षण असल्याचे व ते पुरुष हॉर्मोनमुळे निर्माण होत असल्याचेही या गाठींच्या दोषावरून दिसून येते. स्त्रीशरीराच्या इतर भागाप्रमाणेच तिच्या जननेंद्रियावरील केससुद्धा पुरुषी लक्षण असल्याचे म्हणजे ते पुरुष हॉर्मोनमुळे निर्माण होत असल्याचे आढळून येते. कारण वर उल्लेख केलेल्या दोन वर्षे वयाच्या मुलीच्या जननेंद्रियावर पुरुष हॉर्मोनमुळे केस उगवल्याचे आढळून आले. याचा आणखी एक निर्णायक पुरावा म्हणून एका २३ वर्षे वयाच्या स्त्रीचे उदाहरण देता येईल. या स्त्रीच्या योनिभागावर यत्किंचित्‌ही केस नव्हते. तिला पुरुष हार्मोनचा बाहेरून पुरवठा करताच तिच्या योनिभागावर केस उगवले. पण हा पुरवठा बंद करताच पुन्हा ते केस नाहीसे झाले. या स्त्रीच्या शरीरात इतर सर्वसामान्य स्त्रियाप्रमाणे पुरेशा प्रमाणात पुरुष हॉर्मोन तयार होत नव्हते. हे तिच्या शरीरातील हॉर्मोनच्या रासायनिक परीक्षेवरून ( urinary 17-ketosteroid test ) दिसून आले.[१] XO रंगसूत्रव्यवस्थेमुळे ( टर्नरच्या लक्षणांनी युक्त ) जी अविकसित स्त्री जन्मते तिच्या योनिभागावर यत्किंचितही केस उगवत नाहीत ही वस्तुस्थितीही या दृष्टीने अर्थपूर्ण आहे. XO मध्ये Y हे पुल्लिंग निर्धारक रंगसूत्र नसल्यामुळे तिच्यात निर्माण होणारा पुरुष हॉर्मोनचा मोठा अभाव या अवस्थेला कारणीभूत होत असला पाहिजे हे उघड आहे.

पुरुष हॉर्मोनमुळे स्त्रीच्या योनिलिंगाची वाढ होते ही वस्तुस्थिति पुरुषाचे शिश्न पुरुष हॉर्मोनच्या प्रभावाखाली विकास पावते हे सिद्ध करते. आणि शिश्न हे लैंगिक आक्रमकतेचे साधन असल्याने ते साधन वापरण्यासाठी आवश्यक असलेली लैंगिक आक्रमकता पुरुषात पुरुष हॉर्मोनमुळे निर्माण व्हावी हे ओघानेच आले. अशारीतीने लैंगिक आक्रमकता हे खास पुरुष लक्षण असले तरी ती आक्रमकता पुरुष हॉर्मोनमुळे स्त्रीमध्ये निर्माण होणे ( पुरुष जननेंद्रियाच्या अभावी ) अशक्य आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.[२] मागच्या विभागात दिलेल्या उदाहरणातील मुलीमध्ये अरेनोब्लास्टोमाच्या गाठीमुळे बेसबॉलमध्ये जी मर्दुमकी दिसून आली ती मर्दुमकी ती गाठ कापून काढताच नाहीशी झाली, ही गोष्ट पुरुष हॉर्मोन शारीरिक सामर्थ्य व पराक्रमशीलता वाढवीत असल्याचे दर्शविते. आणि वस्तुतः खेळातील व युद्धातील मर्दुमकी किंवा पराक्रमशीलता म्हणजे लैंगिक आक्रमणशीलतेताच पण वेगळा आविष्कार असल्याने पुरुष हॉर्मोनचा शरीरावर व मनावर होणारा परिणाम क्रियात्मकदृष्ट्या भिन्न असला तरी गुणात्मक दृष्ट्या सारखाच मानला पाहिजे. आणि पुरुष हॉर्मोनमुळे स्त्रीत लैंगिक आक्रमकता खरोखरीच निर्माण होते ही गोष्ट **पुरुष हॉर्मोनमुळे स्त्रीची कामवासना वाढते** या वस्तुस्थितीवरून सिद्ध होते. यावरून कामवासना हे खास पुरुष लक्षण असल्याचेही सिद्ध होते.[३] स्त्रीची कामवासना पुरुष

१. स्त्रीच्या शरीराच्या सर्व भागांवर केस उगवण्यास पुरुष हॉर्मोन कारणीभूत ठरत असले तरी डोक्यावरील केसांच्या बाबतीत मात्र त्याचा थेट उलटा परिणाम होतो, म्हणजे टक्कल पडते, हे आपण पूर्वी पाहिले आहे. 'नवभारत' जून ७०.

२. जननेंद्रियाच्या अभावीसुद्धा पुरुष हॉर्मोनमुळे लैंगिक आक्रमकता इतर काही प्राण्यातील मादीत निर्माण होते हे आपण पूर्वी पाहिले आहे. ('नवभारत' जून, ७० ). पण आपण त्याच लेखात पाहिल्याप्रमाणे मानवी मनाच्या संस्कारशीलतेमुळे अशा प्रकारचा हॉर्मोनचा सरळसोट परिणाम मानवात दिसून येणार नाही.

३. कामवासना, मग ती स्त्रीत असो अगर पुरुषात असो, मुळात आक्रमकतेचे किंवा क्रियाशीलतेचे (म्हणजे पुरुषत्वाचे) लक्षण कसे आहे हे घुशीवर केलेल्या पुढील प्रयोगावरून स्पष्ट होते. मादी घुशीला एका फिरत्या ड्रममध्ये ठेवले तर एरवी ती सहा तासांच्या अवधीत तो ड्रम एकशे ते दोनशे वेळा फिरविते. पण तीच मादी मस्तीत आल्यावर त्याच अवधीत तो ड्रम चार हजार वेळा फिरविते. यावरून कामवासनेमुळे व्यक्ति–मग ती स्त्री असो अगर पुरुष असो–क्रियाशील किंवा आक्रमक बनते, दुसऱ्या शब्दात, कामवासना हे पुरुष लक्षण आहे, हे सिद्ध होते.

हॉर्मोनमुळे वाढते यावरून स्त्रीमध्ये कामवासना पुरुष हॉर्मोनमुळेच निर्माण होते असे काही म्हणता येत नाही हे खरे आहे. तथापि प्रत्येक स्त्रीत पुरुष हॉर्मोन आढळून येत असल्यामुळे तिच्यातील कामवासना पुरुष हॉर्मोनमुळेच निर्माण होत असावी असे समजण्यास वाव मिळतो. उदा. काही स्त्रियांची कामवासना काही पुरुषांच्या कामवासनेपेक्षा जास्त तीव्र असल्याची आढळून येते. आणि प्रत्यक्षात काही निरोगी स्त्रियात काही निरोगी पुरुषापेक्षा जास्त पुरुष हॉर्मोन ( टेस्टोस्टेरोन ) आढळून येते.[1] यावरून कामवासना ही प्रत्यक्ष टेस्टोस्टेरोनच्या प्रमाणावरून ठरते किंवा त्यांच्यामध्ये प्रमाणात्मक कार्यकारण संबंध आहे असे कोणी समजू नये. कामवासना ही एक अत्यंत गुंतागुंतीची शारीरिक व मानसिक प्रक्रिया असून ती बऱ्याच अंशी आनुवंशिक घटकावरून ठरते. म्हणून पुरुष हॉर्मोनचे प्रमाण जास्त असूनही आनुवंशिकतेने निर्धारित शारीरिक वा मानसिक प्रतिक्रियाशीलता (responsiveness) कमी असेल तर कामवासनेचा प्रादुर्भाव तितक्या तीव्र स्वरूपात होणार नाही. या ठिकाणी उल्लेख करण्यासारखी आणखी एक गोष्ट म्हणजे काही वेळा गरोदरपणी स्त्रीत कामवासना वाढते व तिच्या ओठावर मिशासारखी लव फुटते. प्रोजेस्टेरोन हे हॉर्मोन गरोदरपणी जास्त प्रमाणात निर्माण होत असून प्रोजेस्टेरोनपासून १७–हायड्रॉक्झी–प्रोजेस्टेरोन व अन्ड्रोस्टेनोडायोन हे पुरुष हॉर्मोन तयार होतात. स्वतः प्रोजेस्टेरोन हे हॉर्मोनसुद्धा अल्पांशाने पुरुषी हॉर्मोन ( androgenic ) असल्याचे आढळून आले असून ते निर्माण करणारी एंझाईम व्यवस्था पुरुषातही आढळून येते. या सर्व गोष्टींवरून **कामवासना हे शारीरशास्त्रदृष्ट्या पुरुषी लक्षण असल्याचे सिद्ध होते.** आणि पुरुष हॉर्मोनमुळे लैंगिक आक्रमकतेचा उद्भव होत असल्याचे खालच्या वर्गातील प्राण्यावरील प्रयोगावरून आढळून आले असल्यामुळे पुरुष हॉर्मोनमुळे कामवासना निर्माण व्हावी हे अपेक्षितच आहे.[2]

वरील सर्व पुरुषीकरणाची लक्षणे ज्या गाठीमुळे निर्माण होतात त्या गाठी शस्त्रक्रियेने कापून काढताच बऱ्याच प्रमाणात कमी होतात व काही लक्षणे पूर्णपणे नाहीशी होतात. पूर्णपणे नाहीसे होणाऱ्या लक्षणापैकी कामवासना हे एक लक्षण आहे हे येथे आवर्जून सांगितले पाहिजे. त्याचप्रमाणे बहुतेक सर्व स्त्रियांना वाढलेली कामवासना ( दाढी व मिशा यासारख्या इतर पुरुष लक्षणाप्रमाणेच ) त्रासदायक वाटते व त्याबद्दल त्या तक्रार करतात ही गोष्ट उल्लेखनीय आहे. कामवासना स्त्रीला अडचणीची व त्रासदायक वाटण्याचे कारण काही अंशी सामाजिक व सांस्कृतिक असले तरी केवळ तेच एक कारण आहे असे समजू नये. या दृष्टीने पुरुषाचा कामवासनेविषयीचा दृष्टिकोन उल्लेखनीय आहे. वाढलेली कामवासना त्याला त्रासदायक तर वाटत नाहीच, पण ती कमी झाली तर मात्र तो अनेकवेळा दुःखी होतो व ती वाढविण्यासाठी कामोत्तेजके (aphrodisiacs) वापरतो. या दृष्टीने वांझ स्त्रियांचा मूल होण्यासाठी चाललेला प्रयत्न व कामवासना दुर्बल असलेल्या पुरुषांचा ती वाढविण्यासाठी चाललेला प्रयत्न हे स्त्रीपुरुषांना स्वतःचा आत्माविष्कार कोणत्या क्षेत्रात सापडतो या गोष्टीची कल्पना देण्यास पुरेसे आहेत.

### सस्तन प्राण्यावरील प्रयोग

अड्रेनल ग्रंथीवर पुरुषीकरणाच्या गाठी का उठतात या मूळ प्रश्नाच्या बाबतीत मात्र वैद्यकशास्त्र अबोल

१. अलीकडे फिंकेल्स्टीन, फॉरशीली आणि डॉर्फमन यानी रक्तातील टेस्टोस्टेरोन हे पुरुष हॉर्मोन मोजण्याची पद्धत हुडकून काढली असून तदनुसार निरोगी पुरुषातील टेस्टोस्टेरोनचे सरासरी प्रमाण दर १०० मि. लि. मध्ये ०.५६ मायक्रो ग्रॅम इतके भरते, तर निरोगी स्त्रीमधील तेच प्रमाण ०.१२ मायक्रो ग्रॅम इतके भरते. पण हे सरासरी प्रमाण आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. प्रत्यक्षात हे प्रमाण काही निरोगी पुरुषात ०.१ मा. ग्रॅ. इतके भरले, तर काही निरोगी स्त्रियात ०.२६ मा. ग्रॅ. इतके भरले. म्हणजे काही निरोगी स्त्रियात काही निरोगी पुरुषापेक्षा दुपटीहून जास्त टेस्टोस्टेरोन आढळून आले.

२. 'नवभारत' जून ७०. पुरुष हॉर्मोनमुळे पुरुष जननेंद्रिय नसतानासुद्धा ज्युवेलफिश या माशातील मादी आक्रमक बनून इतर मादीशी लैंगिक संयोग साधण्याचा प्रयत्न करते.










आहे. कॅन्सरसारखाच हा एक रोग असून कॅन्सर का होतो यासारखाच हाही एक संशोधनाचा प्रश्न आहे असे वाटणे शक्य आहे. या दृष्टीने लिटल या शास्त्रज्ञाने उंदरावर केलेले प्रयोग उद्बोधक आहेत. अनुवंश व कॅन्सर यांच्या संबंधाचा अभ्यास करण्यासाठी काही विशिष्ट जातीच्या उंदरावर लिटलने हे प्रयोग केले. एका जातीच्या नर उंदरातील लैंगिक ग्रंथी त्याने शस्त्रक्रियेने काढून टाकल्या तेव्हा त्यांच्या अॅड्रेनल ग्रंथीवर गाठी निर्माण झाल्या, आणि त्या नराचे नियमितपणे स्त्रीकरण झाले. या गाठी सौम्य होत्या. आणखी एका जातीच्या उंदरात या गाठी विषारी होत्या. पण नरांचे जसे नियमितपणे स्त्रीकरण होते तसे माद्यांचे नियमितपणे पुरुषीकरण होत नसल्याचे आढळून आले. या प्रयोगावरून हे स्पष्ट होते की लैंगिक ग्रंथींचे कार्य बिघडल्यास ( येथे प्रयोगाने ) अॅड्रेनल ग्रंथींवर पुरुषीकरणाच्या अगर स्त्रीकरणाच्या विशिष्ट गाठी निर्माण होतात व त्या प्राण्याचे लिंग बदलते. म्हणजे ज्या प्राण्यात लैंगिक ग्रंथी बिघडतात त्या प्राण्यात एक प्रकारचे उत्परिवर्तन होते. अशा उत्परिवर्तनाला पेशीरसातील गुणघटकाचे उत्परिवर्तन ( Plasmagene mutation ) म्हणतात. जेव्हा रंगसूत्रातील गुणघटक ( genes ) आपले काम व्यवस्थितपणे करीत असतात त्यावेळी हे पेशीरसातील गुणघटक निष्क्रिय असतात. पण हे रंगसूत्रातील गुणघटक काही कारणाने ( उदा. लिटलच्या प्रयोगातील खच्चीकरणाने ) नाहीसे झाले तर हे पेशीरसातील गुणघटक कार्यप्रवृत्त होतात, पण उलट्या दिशेने ! काही कारणाने वा दोषामुळे एक लिंग विकास पावत नाही असे पाहून दुसऱ्या ( विरुद्ध ) लिंगाच्या विकासाची निसर्गाने जणू या पेशीरसातील गुणघटकांच्या रूपाने तरतूदच करून ठेवली आहे ! पण यातही निसर्गाला नराचा विकास मादीमध्ये करण्यात जितक्या प्रमाणात यश येते तितक्या प्रमाणात मादीचा विकास नरात करण्यात यश येत नाही हे उल्लेखनीय आहे. आणि मानवातही ही गोष्ट स्पष्ट निदर्शनास आली आहे. कारण आनुवंशिक लैंगिक दोषामुळे पुरुषाचा विकास स्त्रीत कसा बेमालूमपणे होतो हे मिथ्या-द्विलिंगी पुरुषाचा विचार करताना आपण पाहिले आहे. पण मिथ्या-द्विलिंगी पुरुषाचा जसा पूर्ण स्त्रीत विकास होतो त्याप्रमाणे मिथ्या-द्विलिंगी स्त्रीचा विकास मात्र पूर्ण पुरुषात होत नाही. अॅड्रेनल ग्रंथीच्या आनुवंशिक लैंगिक दोषामुळे (adrenal hyperplasia ) तो जसा होत नाही तसा अॅड्रेनल ग्रंथीवरील गाठींच्या दोषामुळेही ( adrenal neo plasia ) तो होत नाही. पुरुषाची स्त्री होणे जीवरासायनिक प्रक्रियांच्या दृष्टीने सोपे आहे, पण स्त्रीचा पुरुष बनणे मात्र तितके सोपे नाही असे दिसते. आणि हे स्वाभाविक आहे. कारण नर हा उत्क्रांतीच्या नंतरच्या ( म्हणजे वरच्या ) अवस्थेत निर्माण झाला आहे, आणि ही उच्च अवस्था निर्माण करण्यासाठी नर – निर्मितीच्या विशेष यंत्रणेच्या उत्क्रांतीची आवश्यकता आहे. आणि प्रत्यक्षात अशी विशेष यंत्रणा उत्क्रांत झाली असल्याची आढळून येते. ही विशेष यंत्रणा म्हणजे हॉर्मोन यंत्रणा असून ती लिंगनिर्णय–यंत्रणेच्या उत्क्रांतीच्या वरच्या अवस्थेत कशी निर्माण झाली आहे, किंवा प्रत्यक्ष रंगसूत्रानी लिंग ठरविण्याऐवजी हॉर्मोनमार्फत अप्रत्यक्षपणे ते ठरविण्याची ही पद्धत कशी अधिक उत्क्रांत अवस्था दर्शविते हे शास्त्रज्ञानी केलेल्या लिंगबदलाच्या काही प्रयोगांवरून स्पष्ट होत असल्याने या प्रयोगांचा आढावा घेणे उचित होईल.

हे प्रयोग प्रत्यक्ष मानवावर करणे अशक्य असल्यामुळे सर्वच बाबतीत मानवाप्रमाणे असलेल्या इतर सस्तन प्राण्यावर ( उदा. ससे, उंदीर घुशी इ० ) ते करण्यात आले आहेत. समजा नुकतेच जन्मलेल्या घुशीचे एक नर पिलू घेतले व त्याचे दोन्ही पुरुषबीजकोश ( वृषण ) कापून टाकले, तर काय होईल ? प्रत्यक्षात असे आढळून येते की त्याची बाह्यतः पुल्लिंगी दिशेने होणारी वाढ ताबडतोब थांबते. त्याचे शिश्न खुरटलेले राहते व प्रोटेस्ट ग्रंथी व वीर्याशय वाढत नाहीत. खच्ची न केलेल्या घुशीच्या नर पिलात एव्हाना या अवयवांची पूर्ण वाढ झालेली असते. या खच्ची केलेल्या पिलात इतर नरघुशीच्या पुरुषबीजकोशांचे शस्त्रक्रियेने परत आरोपन केले तर हे खुरटलेले अवयव परत नेहमीसारखे वाढतात व त्या पिलाची सामान्य नरात वाढ होते. यावरून पुरुषबीजकोशात पुल्लिंगी जननेंद्रिये व इतर पुरुषलक्षणे निर्माण करण्याचे सामर्थ्य आहे हे उघड आहे. हे 'सामर्थ्य' म्हणजे त्या बीजकोशात








तयार होणारे पुरुष हॉर्मोन होय. कारण या हॉर्मोनचा कृत्रिमपणे इंजेक्शनने पुरवठा केला तरी हाच परिणाम घडून येतो.

आता अशाच प्रकारचे प्रयोग मादी पिलावर केले–म्हणजे तिचे शस्त्रक्रियेने स्त्रीबीजकोश काढून टाकले–तर काय होईल ? वरील प्रयोगावरून असा तर्क करायला हरकत नाही की तिची मादीत होणारी वाढ तावडतोब थांबेल. पण तसे होत नाही ! आणि हेच तर स्त्री-पुरुषांच्या शरीरभिन्नतेतील मर्म आहे. मादीची वाढ स्त्री-बीजकोशाशिवाय सुद्धा होत राहते. ईस्ट्रोजेन या स्त्रीहॉर्मोनचे इंजेक्शन देऊन तिची स्त्रीकरणाची गतीही वाढविता येत नाही. यावरून मादीच्या वाढीसाठी हार्मोनची गरज नाही, पण नराच्या वाढीसाठी मात्र त्याची जरूरी आहे ही गोष्ट उघड होते. ही गोष्ट वरील नराच्या खच्चीकरणाच्या प्रयोगावरूनही स्पष्ट होते. पुरुष-बीजकोश काढून टाकलेल्या नराची वाढ तर खुंटतेच, पण त्याच्यामध्ये मादीची लक्षणे दिसू लागतात. अर्थात् अगोदरच काही नर इंद्रिये तयार झालेली असल्यामुळे ( उदा. शिश्न ) ती पूर्णपणे नाहीशी होत नाहीत. पण मादीची इतर काही वैशिष्ट्ये उदा. मादीच्या केसांचा प्रकार इ. निर्माण होतात ( खच्चीकरण केलेल्या पुरुषामध्ये बायकी आवाज, चरबीची वाढ, जननेंद्रिया-भोवती स्त्रीविशिष्ट त्रिकोणाकृति केसांची वाढ इ. स्त्रीलक्षणे दिसू लागतात. ) अशा रीतीने नराचे खच्ची-करण केले तर नराची वाढ थांबून त्याच्यात मादीची लक्षणे दिसू लागतात, पण मादीचे खच्चीकरण केले तर तिच्यात नराची लक्षणे दिसत नाहीत, इतकेच नव्हे तर तिच्या स्त्रीलक्षणामध्ये होणारी वाढही थांबत नाही. यावरून मादीच्या वाढीसाठी कोणत्याही प्रकारच्या विशिष्ट हॉर्मोन्सची जरूरी नाही, **प्रत्येक शरीराचा मादी होणे हा अंगभूत गुणधर्म आहे** हे स्पष्ट होते.

नराचे खच्चीकरण नराच्या जन्मानंतर केले असल्या-मुळे व जन्म होईपर्यंत त्याची नरात वाढ झाली असल्याकारणाने त्याचे उलट संपूर्ण मादीत रूपांतर होणे अशक्य आहे हे उघड आहे. नर जन्मण्या-पूर्वी हे प्रयोग केले तर नराचे संपूर्ण मादीत रूपांतर होणे शक्य आहे काय ? असा येथे साहजिकच प्रश्न उद्भवतो. या दृष्टीने जोस्ट या शास्त्रज्ञाने सशावर काही प्रयोग केले आहेत. त्याने गर्भाशयात असतानाच सशाच्या गर्भाचे पुरुषबीजकोश काढून टाकले ( intrauterine castration ) तेव्हा **त्या पुल्लिंगी गर्भाची जननेंद्रिये पुल्लिंगी बनण्याऐवजी स्त्रीलिंगी बनल्याचे आढळून आले.** तसेच त्याने स्त्रीलिंगी गर्भाचे स्त्रीबीजकोश काढून टाकले तेव्हा त्याच्या स्त्रीलिंगी जननेंद्रियाच्या वाढीत कसलाच फरक पडला नसल्याचे आढळून आले. यावरून नराच्या वाढीला पुरुष हॉर्मोनची आवश्यकता आहे, पण मादीच्या वाढीला स्त्री हॉर्मोनची–नव्हे कोणत्याच हॉर्मोनची आवश्यकता नाही हे स्पष्ट होते. कदाचित् स्त्रीलिंगी गर्भाचे स्त्रीबीजकोश काढून टाकल्यानंतर त्या गर्भाच्या इतर भागातून स्त्रीहॉर्मोनचा पुरवठा होत नसेल कशावरून ? असा येथे संशय निर्माण होतो. कारण आपण मागे पाहिल्याप्रमाणे अड्रेनल ग्रंथीपासूनही या हॉर्मोन्सची निर्मिति होते. या संशयाचे निरसन करण्यासाठी जोस्ट व बोझिग या दोघा शास्त्र-ज्ञांनी गर्भाच्या ज्या मूळ मुलेरियन व वुल्फियन नलिका-पासून अनुक्रमे स्त्री व पुरुष जननेंद्रिये निर्माण होतात ( या दोन्ही प्रकारच्या नलिका प्रत्येक गर्भात असतात. ) त्या नलिका गर्भाबाहेर काढल्या व त्यांची कृत्रिमपणे काचपात्रात ( in vitro ) सारख्याच परिसरात पण हॉर्मोन्सच्या पुरवठ्याशिवाय जोपासना केली, तेव्हा असे आढळून आले की या दोन नलिकांपैकी वुल्फियन (पुरुषी) नलिकांची वाढ न होता फक्त मुलेरियन (स्त्री) नलिकांचीच वाढ होते. म्हणजे कोणत्याही हॉर्मोनचा पुरवठा केला नाही तर गर्भ स्त्रीलिंगीच बनतो हे उघड झाले. अशा रीतीने **कोणत्याही सस्तन प्राण्याचा स्वाभाविक कल मुळात स्त्रीलिंगी बनण्याकडे असतो व पुरुष हॉर्मोनमुळेच तो पुल्लिंगी बनतो** हे निश्चितपणे सिद्ध होते. यावरून स्त्रीकरण हा जीवाचा शरीरशास्त्रीय (नैसर्गिक) गुणधर्म असून पुरुषीकरण हा उत्क्रांतीच्या वरच्या अवस्थेत हॉर्मोन यंत्रणेच्या उत्क्रांतीमुळे निर्माण झालेला गुणधर्म आहे असे म्हणता येईल. दुसऱ्या शब्दात, मादी हा शरीरशास्त्रदृष्ट्या मूलभूत प्राणी असून नर हा तिच्यापासून उत्क्रांत झालेला अधिक गुंतागुंतीचा प्राणी आहे असे म्हणता येईल. या दृष्टीने पाहता स्त्रीपासून पुरुष निर्माण झाला आहे असे










म्हणावयास हरकत नाही. बायबलातील पुरुषाच्या बरगडीपासून स्त्री निर्माण झाल्याची कथा हा पुरुषी अहंमन्यतेचा एक पौराणिक नमुना म्हणता येईल! पण त्याचबरोबर पुरुष हा मानवाची अधिक उत्क्रांत अवस्था दर्शवितो असेही म्हणणे भाग आहे. पण 'अधिक उत्क्रांत अवस्था' याचा अर्थ उत्क्रांतीमधील 'नंतरची व अधिक गुंतागुंतीची अवस्था' इतकाच करावयाचा. उत्क्रांतीमधील नंतरची व अधिक गुंतागुंतीची अवस्था ही नेहमी अधिक सुधारलेली किंवा अधिक प्रगत अवस्था असते असा काही जीवशास्त्रीय नियम नाही. अर्थात् या प्रश्नाचा विचार पुढे करावयाचा असल्यामुळे येथे एवढेच सांगितले पाहिजे की पुरुष हा स्त्रीच्या मानाने जीवशास्त्रदृष्ट्या अधिक उत्क्रांत झालेला आहे.

## निष्कर्ष

मागच्या लेखात आपण ज्या आनुवंशिक लैंगिक दोषांचा विचार केला ते दोष स्त्रीपुरुषात कमी-जास्त सारखेच आढळून येत असले तरी त्यात स्त्रीच्या पुरुषीकरणापेक्षा पुरुषाचे स्त्रीकरण अधिक पूर्णपणे घडून येते. याउलट शरीरशास्त्रीय लैंगिक दोष हे प्रामुख्याने स्त्रीतच आढळतात व ते स्त्रीचे संपूर्ण पुरुषीकरण कधीच करीत नाहीत. अशा रीतीने लैंगिक दोषाविषयी सामान्यपणे असे म्हणता येईल की हे दोष पुरुषापेक्षा स्त्रीलाच जास्त त्रासदायक ठरतात. कारण पुरुषाचे संपूर्ण स्त्रीकरण झाल्यामुळे त्याला कसलीच अडचण वाटत नाही. तो स्त्री म्हणून खुशाल वावरू शकतो. उलट अर्धवट पुरुषीकरण झाल्यामुळे स्त्रीचे जीवन असह्य बनते. चेहऱ्यावरील केस (दाढी व मिशा), पुरुषी शरीराकृति, वांझपणा, वाढलेली कामवासना इ० पुरुष लक्षणे स्त्रीला स्वाभाविकच त्रासदायक ठरतात. पुरुषाचे मात्र अशाप्रकारे अर्धवट स्त्रीकरण क्वचित्‌च होते. या गोष्टीची उत्क्रांतिवादी दृष्टिकोनातून उपपत्ति देता येते. मादीपासून नराची उत्क्रांति झाली असल्याने नरनिर्मितीचे काही अंश मादीत अवशेष रूपाने अस्तित्वात असणे अपरिहार्य आहे. (खालच्या अनेक वर्गात मादी ही मुळात बीजभूत द्विलिंगी-potentially hermaphrodite- असल्याचे आपण पूर्वी पाहिले आहे.) हे पुरुषीकरणाचे अवशिष्ट अंश (vestiges) अपेंडिक्सप्रमाणे स्त्रीला अधूनमधून त्रास देतात व ते शस्त्रक्रियेने काढून टाकावे लागतात असे म्हणता येईल. याउलट पुरुषाचे संपूर्ण स्त्रीकरण का व्हावे हा एक प्रश्नच आहे. कदाचित् (आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे) पुरुष हा रंगसूत्रांच्या उत्क्रांतीच्या दृष्टीने अपूर्ण स्त्री असल्याने त्याचे संपूर्ण स्त्रीकरण हा मूलभूत जीवशास्त्रीय प्रक्रियांचा स्वाभाविक कल आहे असे म्हणता येईल. हा तर्क बरोबर असल्याचे सस्तन प्राण्यावरील प्रयोगावरून आढळून येते. कारण सस्तन प्राण्यात स्त्रीशरीराची वाढ हा त्या शरीराचा मूलभूत जीवशास्त्रीय (किंवा अंगभूत) गुण असल्याचे व पुरुष शरीराच्या वाढीसाठी अधिक उत्क्रांतावस्थेतील हॉर्मोन यंत्रणेची गरज असल्याचे आढळून येते. ही गोष्ट स्त्री ही जीवशास्त्रीय दृष्टीने मूलभूत प्राणी असल्याची व पुरुष हा जीवशास्त्रदृष्ट्या अधिक उत्क्रांत प्राणी असल्याची निदर्शक आहे. त्याचबरोबर सर्व पुरुष लक्षणे हीसुद्धा अधिक उत्क्रांत अवस्था दर्शवितात असे म्हणणे भाग आहे. पुरुष लक्षणापैकी कामवासना हे एक प्रमुख व महत्त्वाचे पुरुष लक्षण असून ते स्वाभाविकपणेच मानवाचे अधिक उत्क्रांत अवस्थेचे द्योतक ठरते.

अशा रीतीने लैंगिक दोषांच्या चर्चेतून दोन मुख्य निष्कर्ष निघत असून ते जीवशास्त्राच्या व अनुवंशशास्त्राच्या चर्चेतून निघणाऱ्या निष्कर्षांना बळकटी आणतात. म्हणजे जीवशास्त्र, अनुवंशशास्त्र व शरीरशास्त्र ही तीनही शास्त्रे पुढील दोन निष्कर्ष निरपवादपणे प्रस्थापित करतात. पहिला निष्कर्ष म्हणजे स्त्री ही जीवरासायनिक प्रक्रियांच्या दृष्टीने मूलभूत (म्हणून स्वयंपूर्ण व आत्मनिर्भर) प्राणी आहे व पुरुष हा तिच्यापासून उत्क्रांत झालेला (म्हणून तिच्यावर अवलंबून असणारा) दुय्यम प्राणी आहे. पुरुष हा स्त्रीपासून उत्क्रांत झाला आहे या निष्कर्षापासून निघणारा दुसरा निष्कर्ष म्हणजे पुरुषत्व हे जीवशास्त्रदृष्ट्या उत्क्रांतीची वरची अवस्था दर्शविते. स्वाभाविकच सर्व पुरुष लक्षणे ही मानवी उत्क्रांतीच्या उच्च अवस्थेची निदर्शक ठरतात. या पुरुष लक्षणांपैकी कामवासना हे एक प्रमुख व महत्त्वाचे पुरुष लक्षण असून ते मानवाचे जीवशास्त्रदृष्ट्या अधिक उत्क्रांत अवस्थेचे लक्षण ठरत असल्याने त्याचा विस्ताराने विचार करणे क्रमप्राप्त ठरते.

---








श्री. ना. बा. मराठे

# संस्कृत : आस्था नि अनास्था

माध्यमिक शिक्षणातून संस्कृत वैकल्पिक केले गेल्यामुळे महाराष्ट्रातील वृत्तपत्रांतून संस्कृत शिक्षणाबद्दल उलट सुलट मतमतांतरे चर्चिली जात आहेत. अशा वेळी संस्कृत भाषा आणि त्यातील वाङ्मय या संबंधीच्या आपल्या कल्पना अधिक विशद रहाव्या हे कालोचित होईल. माध्यमिक शिक्षणातून संस्कृतला वैकल्पिक केल्याने संस्कृतीचा जणू प्रचंड ऱ्हास झाला अशा पवित्र्यात संस्कृतचे पाईक वर्तमानपत्राचे रकाने भरू लागले आहेत. तर विचारशील शिक्षणतज्ज्ञ त्याकडे अधिक व्यापक दृष्टिकोणातून पाहू लागले आहेत. माध्यमिक शालान्त परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या प्रचंड संख्येकडे लक्ष देता आणि ते ज्या समाजाच्या थरातून येत आहेत याकडे लक्ष वेधता संस्कृत, प्राकृत; पालि, पर्शियन, अरॅबिक, ग्रीक, रोमन यासारख्या 'क्लासिकल्' भाषाभ्यासाला वैकल्पिक स्थान देणे अत्यंत उचित आहे. हे आता महाराष्ट्र सरकारच्या स्कूल बोर्डाप्रमाणे भारतातील इतर राज्यांच्या बोर्डांनीही मान्य करून त्याची अंमलबजावणी सुरू झाली आहे. संस्कृत ही मृतभाषा आहे. या स्थूल आक्षेपाने त्यांच्या तत्त्वाची दिशा प्रेरित झालेली नसून शालान्त परीक्षेला बसणाऱ्या प्रत्येक मुलामुलीला त्या घटपटाच्या खटपटीतून जाण्याची जरूरी नाही असा त्याचा अर्थ आहे. संस्कृत वैकल्पिक झाले त्याच बरोबर पदार्थ विज्ञान-रसायन, गणित, इंग्लिश या सारखे आजच्या कालाला अत्यंत जरूर असलेले विषयही आवश्यक गणले जात नसून विद्यार्थ्यांच्या आवडीनुसार त्यांचा अभ्यास करण्याची विद्यार्थ्याला पूर्ण मुभा असते. अत एव संस्कृत वा अन्य प्राचीन भाषांना विकल्पात काढल्याबद्दल शिक्षणखात्यावर उसळून पडण्याचे कारण नाही.

## संस्कृत तज्ज्ञांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था ?

ज्या सरकारने माध्यमिक शालान्त परीक्षेतून संस्कृतचे उच्चाटन करण्यास संमति दिली त्याच सरकारने वैदिक घनपाठी विद्वानांच्या सत्काराची मोहीम घेऊन त्या विद्येला आणि विद्यावंतांना उत्तेजन देण्याचे धोरण अवलंबिले आहे. वेदांचे अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना शैक्षणिक अनुदाने देण्यास सुरुवात केली आहे. केन्द्र सरकारनेही सेंटर फॉर ॲड्व्हान्स स्टडीज् ऑफ संस्कृत सारख्या स्वतंत्र संस्थांना मान्यता देऊन संस्कृतच्या अध्ययनाची सोय केली आहे. शास्त्री संस्कृत विश्वविद्यालय, केन्द्रीय संस्कृत शिक्षाविद्यालय तिरुपति, यासारख्या संस्थांचा आर्थिक बोजा पूर्णपणे उचलला आहे. संस्कृत विश्वविद्यालय-वाराणसी, संस्कृत विश्वविद्यालय-दरभंगासारख्या राज्यपातळीवरच्या संस्कृतविश्वविद्यालयांना आपला कारभार करण्यास पूर्ण मुभाच नव्हे तर योग्य त्या आर्थिक अनुदानासह मदत केली आहे. साहित्य अकादमीसारख्या संस्थांमार्फत संस्कृतमधील उत्तमोत्तम ग्रंथांना इतर भाषिक ग्रंथांच्या बरोबरीने पारितोषिके दिली जात आहेत. शिवाय भारतातील बहुधा साऱ्या विश्वविद्यालयातून संस्कृत-प्राकृत सारख्या प्राचीन भाषांच्या सखोल अध्ययनाची सोय आहे. केवळ संस्कृतचा सखोल अभ्यास करणाऱ्यांना त्यामुळे आजच्यासारखी संपन्न व्यवस्था क्वचितच् होती. बनारससारख्या ठिकाणी जाऊन मधुकरी-वारकरी पद्धतीने धर्मशाळेतील जीवन कंठून संस्कृतचे अध्ययन करण्याचे दिवस आता राहिले नाहीत. किंवा तसे विद्यार्थीही मिळणे दिवसेदिवस दुष्प्राप्यच झाले आहे. जुन्या काळी संस्कृतज्ञही थोडेच असत आणि तेही एका विशिष्ट पुरोहित-याज्ञिक-भिक्षुक-वैदिक-शास्त्री - ज्योतिषी - वैद्य-पुराणिक-कीर्तनकार यासारख्याच व्यवसायातून येत त्यामुळे त्यांच्या उदरनिर्वाहाची समाजाला काळजी असे. आता हा वर्ग राहिला आहे कुठे ? या वर्गात नव्या रक्ताची भर पडत आहे का ? आणि जी थोडी फार भर पडत असेल त्यांचेसाठी तशा धोरणाच्या पाठशाळा चालूच आहेत. वर उल्लेख केलेल्या व्यावसाइकांनी








माध्यमिक शालान्त परीक्षेची कास क्वचितच धरलेली असल्याने त्यांचे बाबतचा प्रश्नच उद्भवत नाही. इतर व्यावसाइकांना त्यांच्या व्यवसायाला उपयुक्त ठरणारे संगीत, शिवणकला, सुतारकाम, डॉमेस्टिक सायन्स सारखे अनंत विषय माध्यमिक शालान्त परीक्षेच्या अभ्यासक्रमात अन्तर्भूत केले गेल्याने त्याची व्याप्ती वाढलीच आहे. प्रत्येक मुलामुलीने गृहशास्त्राचा अभ्यास केलाच पाहिजे असा कुणी आग्रह धरील काय ? तसे पाहिले तर प्रत्येक सुबुद्ध नागरिकाला जितके संस्कृतचे ज्ञान अत्यावश्यक असेल तितकेच दैनंदिन जीवनात अत्यंत जिव्हाळ्याचे ठरणारे गृहशास्त्रही अत्यंत आवश्यक आहे. पण त्याचा आवश्यक विषयात अन्तर्भाव करावा असा आग्रह कुणीच धरत नाही. ज्याला त्या विषयाची आवड वा जरूरी आहे त्यांना त्या विषयाचा अभ्यास करण्याची मुभा आणि संधि मिळालीच पाहिजे याबद्दल दुमत होण्याचे काय कारण ?

## संस्कृतची आवश्यकता

संस्कृतचे अध्ययन प्रत्येकाने केलेच पाहिजे असे म्हणणे हा एक प्रकारचा दुराग्रह आहे. या उलट ज्याच्या उच्च शिक्षणाला संस्कृतचा पाया असला तर अधिक तेज येणार असेल अशा विद्यार्थ्याला संस्कृत अनिवार्य विषय म्हणून ठेवला पाहिजे. उदाहरणार्थ मराठी मुख्य विषय घेऊन एम्. ए. किंवा पीएच. डी. करणाऱ्याला संस्कृतचे अध्ययन अनिवार्य करायलाच हवे. कारण संस्कृत ही स्रोत भाषा ( source language ) आहे. मराठीच्या पायाशुद्ध अध्ययनाला संस्कृतच्या अध्ययनाशिवाय गत्यंतर नाही. हीच गत भारतीय राज्यातील कोणत्याही आधुनिक राज्यभाषांचीही आहे. उर्दूच्या उच्च अध्ययनाला संस्कृत ऐवजी पर्शियन अॅरेबिकची नितान्त जरूरी आहे.

माध्यमिक शाळांमधून संस्कृतचे उच्चाटन झाले म्हणून केवळ टाहो फोडण्यात अर्थ नाही. शंभर दीडशे वर्षांपूर्वी संस्कृत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचा उदरभरणाचा प्रश्न काही अंशी सुटत असे तसा तो या दिवसात सुटणारा नाही. संस्कृतच्या आश्रयाने ज्यांना उदरभरणाचा प्रश्न सोडवावा असे वाटते त्यांचेसाठी मार्ग भिन्न आहेत. संस्कृतच्या आश्रयाने उदरभरणाचे सन्माननीय मार्ग तितक्याच प्रमाणात किंवा काही अंशी अधिक प्रमाणात स्वातंत्र्योत्तर कालीन भारतात उपलब्ध आहेत. स्वातंत्र्योत्तर कालीन भारतात भारतीय विद्यांच्या ( oriental studies ) संशोधन कार्यात मग्न असणाऱ्या कितीतरी संशोधन संस्था उदयाला आल्या आहेत. या संस्थांतून कार्य करण्यासाठी संस्कृतज्ञांची विशेष जरूरी असते. शिवाय भाषाशास्त्र, कायदा, धर्म, तत्त्वज्ञान, भारताचा प्राचीन सांस्कृतिक इतिहास, नाणकशास्त्रज्ञ, पुराविद्या, उत्खननशास्त्र, समाजशास्त्र – नृतत्त्वशास्त्र या सारख्या भारतीय विद्यान्तर्गत अनेक शाखोपशाखांतून संस्कृतच्या पायाशुद्ध ज्ञानाची नितान्त जरुरी आहे. संस्कृतच्या अध्ययनाखेरीज या शास्त्रात गति होणेच शक्य नाही. आणि अशा उच्च अध्ययनांतून संस्कृत मूलस्रोत भाषा ( source language ) म्हणून अजूनही तितक्याच अर्थी ' अमर ' होऊन चिरकाल राहाणार आहे.

## भारतेतर जगात संस्कृतची प्रतिष्ठा

गेल्या दीडशे पावणेदोनशे वर्षांत भारतात ज्या प्रमाणात संस्कृतची प्रतिष्ठा वाढली आहे तिचे बरेचसे श्रेय पाश्चात्य भारतीय विद्यातज्ञांना ( Indologists ) दिले पाहिजे. आजच्या प्रगत मानवीय शास्त्रांच्या ( Humanities ) अभ्यासाला सुरुवात झाली तिचा मूलाधार संस्कृतमधील मूलभूत वाङ्मय आहे. संस्कृत मूलग्रंथांचे शास्त्रीय आलोडन करून त्यातून अमृतमंथन करण्यास पाश्चात्य भारतीय विद्यातज्ञ अहमहमिकेने पुढे सरसावले. त्यासाठी संपूर्ण आयुष्य त्यात ओतणारे आचार्य निघाले. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका, जपान या देशातील प्रत्येक विश्वविद्यालयामध्ये भारतीयविद्या किंवा Oriental Studies या विषयासाठी खास अध्यासने ठेवलेली आहेत. हातावर मोजण्याइतकेही नसतील इतके विद्यार्थी घेऊन हे अध्यापक विद्यासागरात बुडी मारून वरचेवर नवनवे शिंपले वर आणीत आहेत. त्यातील मुक्ताफलांची पारख इतर देशातील जवाहिरे करीत आहेत आणि त्या मूल्यवान् मोत्यांची सर सरस्वतीच्या कंठाभरणात बिनधोकपणे जाऊन बसत आहे. या पाश्चात्य पंडितांची नावे देण्याचे हे स्थल नव्हे. संदर्भापुरताच








त्याचा नामनिर्देश करावयास हवा. डॉ. सुखठणकरांसारख्या पाश्चात्य-पौर्वात्य भारतीयविद्यातज्ञांनी महाभारतासारख्या शतसाहस्री ग्रंथाची संशोधित आवृत्ति काढण्याची मनीषा प्रकट केली आणि भारतीय पंडितांनी त्यांनी घालून दिलेल्या वळणांनी जात आज पन्नास वर्षांनी महाभारताची संशोधित आवृत्ति प्रकाशित झाली आहे. त्याच पावलावर पाऊल ठेऊन भाष्यकारांतें वाट पुसत रामायणाचीही संशोधित आवृत्ति हळूहळू काण्डशः प्रकाशित होत आहे. डॉ. ब्यूलरने तुलनात्मक भारतीय लिपीचे अध्ययन करून आपल्या समोर ठेवले नसते तर? या प्रश्नाला आपल्याजवळ उत्तर नाही. ज्यूलस ब्लॉकने पहिल्या प्रथम उपलब्ध साधनांनिशी मराठी भाषेचा शास्त्रीय अभ्यास करून आपल्या समोर ठेवला नसता तर भाषेचा शास्त्रीय अभ्यास म्हणजे काय हे कळण्याची ताकदही आपल्याला आली नसती. बौद्धधर्म आणि तत्त्वज्ञान यांचा जर्मन आणि जपानी पंडितांनी जेवढा अभ्यास करून ठेवला आहे वा चालू आहे त्याने सम्पूर्ण मानवजातीला त्यांनी कृतज्ञ करून ठेवले आहे. पाणिनीचा सशास्त्र अभ्यास करून आजच्या जगातील Comparative philology, Linguistics syntax, morphology, phonetics, semantics, सारख्या अनंत शाखोपशाखांचा उद्‌गम व विकास झाला आहे.

हे सर्व खरे असले तरी सर्वसामान्य माणसाला संस्कृत शिकलेच पाहिजे असा आग्रह कोणत्या तत्त्वानुसार करायचा? 'संस्कृतिः संस्कृताश्रिता' याचा अर्थ वेगळया संदर्भात पाहिला पाहिजे. आपल्या संस्कृतीचे मूलस्रोत संस्कृत भाषेतून ग्रथित केले आहेत. संस्कृत भाषेतील या मूलस्रोतांच्या अभ्यासाने आपल्या संस्कृतीची ओळख होण्यास अधिक मदत होते. वाङ्‌मयाभ्यासकाला आणि भाषाभ्यासकाला संस्कृतच्या अभ्यासाची नितांत जरूरी आहे पण प्रत्येक माध्यमिक शालान्त परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्याला त्याची काय जरूरी आहे?

## आजची जरूरी

आज सर्वांत अत्यंत निकडीची गोष्ट आहे ती कालाची पावले ओळखून तदनुरूप आचरण करण्याची! ज्यांना उदरनिर्वाहासाठीच केवळ शिक्षणाची कास धरावयाची आहे त्यांना त्याच प्रकारच्या तांत्रिकी शिक्षणाला आवश्यक तेवढ्या बाबी शिकवून उद्योगाला लावणे. कर्मधर्मसंयोगाने कोणे एके काळी त्याला जरूरी भासली तर ज्ञानाची कवाडे त्याला खुली असावीत एवढेच! तू ज्ञानाची कास धरलीच पाहिजे अशा आग्रहाने कोण ज्ञानाच्या मागे लागणार? आणि अशा आग्रही वृत्तीतून ज्ञानोपासक तरी कुठून निपजणार? ज्ञानोपासना ही ज्या सात्त्विक प्रेरणेतून वाढीला लागते तसले सात्त्विक निकोप वातावरण निर्माण करणे ही सुसंस्कृत समाजाची एक निकड असते. गेल्या चार हजार वर्षांत अनेक सामाजिक आणि राजकीय उलाढाली झाल्या. पण विचारवंतांनी अशा निकोप सांस्कृतिक-सामाजिक वातावरणाची ध्वजा नेहमीच उंचावून धरली. आजही कालाची पावले ओळखून ती ध्वजा तशीच फडकावीत ठेवणे जसे जरूरीचे आहे तसेच कुणावरही अमुक एका शिक्षणाची सक्तीही करता कामा नये. आजच्या लोकशाही युगात कोणत्याही बाबतीत सक्ती कुणीच सहन करणार नाही. लोकप्रवृत्ति आणि लोकनिवृत्ति यांच्या मध्यबिन्दूतून जाणारी रेषा पाहावी लागेल. लोकनिवृत्ति आहे म्हणून काहीच न करताही चालणार नाही. काही विधायक प्रवृत्तींना सक्रिय प्रोत्साहन मिळालेच पाहिजे. बहुमताच्या जोरावर काही गोष्टी घडल्या जात असता अल्पमतात असणाऱ्या सुसंस्कृत चालीरितींना पायतळी तुडवून तर जात नाही ना? याची दखल घ्यावीच लागेल.

दीडशे वर्षे ब्रिटिशांनीं राज्य करूनही भारतात ठिकठिकाणी विखुरलेली संस्कृतहस्तलिखिते गोळा करण्याचा उपद्‌व्याप ब्रिटिश मुत्सद्यांनीं केला, त्यांची योग्य जोपासना केली. संशोधनाला उत्तेजन देऊन संस्कृत भाषा व वाङ्मय याच्या अभ्यासाला वेगळेच महत्त्व आणले. आजच्या स्वातंत्र्याच्या काळात त्या वृत्तीची वाढ व्हायला हवी. संस्कृतीची आणि संस्कृतची जोपासना प्राणपणाने करायला जपणे हे प्रत्येक भारतीयाचे अनन्य कर्तव्य ठरते. या बाबतीत राज्य-भाषा-लिंग-जाति इत्यादि प्रचलित भेदांना अवसर मिळताच कामा नये. संस्कृत ही केवळ आता भारतीयांच्या मालकीची कुणी एक वस्तु राहिली नसून ती

आन्तर्राष्ट्रीय मालकीची वस्तू मानली आहे. भारतीय प्राच्य विद्यापरिषदेप्रमाणेच आन्तर्राष्ट्रीय प्राच्यविद्या-परिषद् ( International oriental congress ) ही जगाच्या कानाकोपऱ्यात भरू लागली आहे. भारत हा एक त्यातील घटक आहे एवढेच ! या आन्तर्राष्ट्रीय परिषदेत संस्कृतच्या बरोबरीने पर्शियन, अरॅबिक, ग्रीक, लॅटिन, चीनी भाषा समप्रमाणात मानमान्यता मिळवून वावरत आहेत. या भारतीय आणि आन्तर्राष्ट्रीय प्राच्य विद्यापरिषदातून महाराष्ट्रीय प्राच्यविद्यापंडितांनी विशेष पुढाकार घेतलेला आहे एवढेच नव्हे तर त्यांच्या विद्वत्तेचा पुरस्कारही केला गेला आहे. आजच्या क्षणी प्रश्न असा आहे की ही विद्वत्परम्परा आणि पांडित्यपरम्परा महाराष्ट्राला टिकवायची आहे किंवा नाही ? टिकवायची असेल तर संस्कृतची आणि विद्वत्तेची आच असलेल्या समाजाला त्यासाठी काही विधायक कर्तव्य आहे किंवा नाही ? तसेच त्या समाजाने निवडून दिलेल्या सरकारलाही त्यासंबंधीची विशिष्ट दिशा ठरवायची आहे किंवा नाही ? या दृष्टीने विचार करताही महाराष्ट्र सरकारने संस्कृतला वेगळे स्थान ठेवले आहे आणि ज्यांना संस्कृत शिकावयाचे नाही त्याची त्यातून सुटका केली आहे हे उचितच केले आहे. त्यासाठी मराठी जनतेने एवढी उलटी सुलटी मते प्रकाशित करण्याचे कारण दिसत नाही.

फार तर एवढे निदर्शनाला आणता येईल की उत्तर प्रदेश, बिहार राज्यसरकारांनी आपापल्या मुलुखारात संस्कृतची बूज राखण्यासाठी एक स्वतंत्र संस्कृत विद्यापीठ स्थापन केले आहे. महाराष्ट्राने प्राच्यविद्यांची वाढवलेली परंपरा लक्षात घेता महाराष्ट्र सरकारही अशा स्वतःच्या मुलुखारात एखादे संस्कृत विश्व-विद्यापीठ स्थापन करण्यास उद्युक्त होणे योग्य होते. इतर राज्यातून शेतकी विद्यापीठे ( Agricultural Universities) स्थापन होऊन वाढीस लागली पण महाराष्ट्रात तशा प्रकारचे विश्वविद्यालय स्थापन करण्यास विद्यार्थ्यांना चळवळ करावी लागली. तेव्हा कुठे सरंजामी शाही अंमलबजावणीची चाके हळूहळू फिरू लागली. तीही एके काळाची जरूरी होती. काळाची पावले ओळखून त्याला साद दिली तरच खरे. प्रत्येक गोष्टीची साद मिळविण्यासाठी चळवळीची कास धरावयास भाग पाडणे ही जी सध्याच्या सरकारी अंमलबजावणी खात्याची धोरणे आहेत ती परिणामी हितकारी होतील असे वाटत नाही. शेतांची आणि लागवडींची ऊर्जिता-वस्था येण्यास शेतकी शिक्षणसंस्थांची जरूरी जितकी निकडीची तितकीच मानवीय शास्त्रांची (Humanities) जोपासना करण्यासाठी-अभिवृद्धि करण्यासाठी, संस्कृतीची बूज राखण्यासाठी त्याच धोरणाने आखलेली, त्याच दिशेने मार्ग आक्रमणा करणारी शिक्षणसंस्था निर्माण करणे हेही सरकारचेच काम आहे. महाराष्ट्रात लौकरच आणखी दोन युनिव्हर्सिटीज् (बहुधा-नाशिक व धुळे) होऊ पाहात आहेत. त्या संबंधीची धोरण व आखणीची वर्तुळे जोरात फिरू लागली आहेत असे ऐकिवांत आहे. सरकारला त्याची आवश्यकता पटल्यानेच ही चाके फिरू लागली असावीत हे निर्विवाद. परंतु भारतीय आणि आन्तर्राष्ट्रीय पातळीवर ज्या भारतीय विद्यांची ( indology) आच महाराष्ट्रीय पंडितांनी राखली व राखीत आहेत अशा पंडितांना स्वगृही मात्र निकृष्ट जिणे जगावे लागत आहे याची दाद कोण घेणार ? डोळ्यासमोर निकृष्ट जीवन जगणारे जगन्मान्य पंडित असले तरी त्या मार्गाचा अवलंब करण्यासाठी नवी पिढी कशी तयार होणार ? या विद्यांचा योगक्षेम चालविण्यासाठी तरी सरकारने आणखी एक कदम पुढे जाऊन केंद्र सरकारने' संस्कृत कमिशन ' नेमून भारतीय क्षितिजावर संस्कृतची किती दुर्दशा आहे याचा मागोसा घेतला तसा महाराष्ट्र सरकारनेही आपल्या पुरता असा मागोवा घ्यावयास हवा. आणि या विद्यांच्या अध्ययन-अध्यापन परंपरा कालातिबाधित कशा राहातील याचा विचार करायला हवा.

या संबंधी काही गोष्टी चटकन् नजरेत भरतात त्या अशा. कै. लाल बहादूरशास्त्री पंतप्रधान झाल्यावर बनारस येथील एका विद्यापीठाला त्वरित मान्यता मिळण्यात यश मिळाले. हे ' काशी विद्यापीठ ' नावाने ओळखले जाते. बनारस येथील हिंदू विश्वविद्यालय व संस्कृत विश्वविद्यालय याहून ही वेगळी संस्था आहे. दुसरे उदाहरण-अहमदाबाद येथील ' गुजराथ विद्यापीठ ' अहमदाबाद येथे युनिव्हर्सिटी असताही त्याला विशेष कारणास्तव मान्यता देण्यात आली. दे. भ. मुरारजी










देसाई यांच्या कृपेचा ओघ तिकडे वळला असावा. गुजरातमध्ये याच कालात आयुर्वेद युनिव्हर्सिटीलाही मान्यता मिळाली आहे. कदाचित् भारतातील केवळ आयुर्वेदाला वाहिलेली अगर प्राधान्याने आयुर्वेदाची विशेष दखल घेणारी युनिव्हर्सिटी म्हणून या युनिव्हर्सिटीकडे अंगुलिनिर्देश करता येईल. काही वर्षापूर्वी ' संस्कृत युनिव्हर्सिटी ' म्हणून कुरुक्षेत्र येथे युनिव्हर्सिटीला मान्यता मिळविण्यात आली आणि आता तिचे इतर युनिव्हर्सिटीत रूपान्तर करण्यात आले आहे. रायपूर येथे ' संस्कृत युनिव्हर्सिटी ' स्थापन करण्याचा मनोदय जाहीर होऊन बरेच दिवस झाले. पुढे त्याचे काय झाले काही कळत नाही. मध्यवर्ती सरकारमध्ये किंवा राज्य सरकारच्या ऑफिसमध्ये विशेष व्यक्ति असली म्हणजे तिच्या इच्छेनुसार सरकारी चक्रे फिरू लागतात असा सर्वसाधारण समज आहे. महाराष्ट्रातील ' टिळक महाराष्ट्रविद्यापीठा'चा दोन्ही स्थळी त्राता नसल्याने त्याला अजूनही मान्यता मिळालेली दिसत नाही.

---









प्रा. ब्रह्मानंद श्रीकृष्ण देशपांडे

# महाकुमार सिंघणदेवाचा चनई शिलालेख

## १ उपलब्धि

प्रस्तुत शिलालेख हा अंबाजोगाई जवळच चनई ह्या गावी उपलब्ध झाला. हे गाव बीड अंबाजोगाई रस्त्यावर अंबाजोगाईपासून अलीकडे ३ मैल अंतरावर आहे. गाव अगदी लहान असून गावाचे पूर्वेस कदंब वृक्षाचे रांईत भग्न देवालयांचे व शिल्पखंडाचे अवशेष इतस्ततः पडले आहेत. याच अवशेषात एक पुष्करिणी ( वापिका ) असून दोन हेमाडपंती शिवालये आहेत पण तीही उध्वस्त व भग्न अवस्थेत असून त्यात अनेक फेरबदल झालेले आढळून येतात.

या शिवमंदिराजवळच एक मोठे टेकाड असून त्याखालीही काही अवशेष असावेत. उत्खनन केल्यास ते उघडकीस येण्याची शक्यता आहे. प्रस्तुत शिलालेख हा ह्या दोन मंदिरापैकी सोमनाथ म्हणून जे मंदीर ओळखले जाते त्या मंदिरवर आहे. शिलालेखाची शिळा मंदिराच्या दर्शनी भागास उजव्या बाजूला आडवी बसविलेली आहे. त्यामुळे ठसे घेणे कष्टाचे काम झाले आहे.

परंतु याकामी अंबाजोगाई येथील एक सज्जन नागरिक व बुक ब्रॉंड चहाचे अभिभावक श्री. ढगे यांनी आणि चनई गावातील श्री. बाबूराव पवार यांनी अत्यंत आस्थापूर्वक आणि सौजन्यपूर्ण मदत केली. त्यांचे आम्ही अत्यंत आभारी आहोत. त्यांचे आतिथ्यशील वागण्याचा ठसा आमच्या हृदयावर कायमचा उमटला आहे. असो.

## २ लेखाचे वर्णन

हा लेख एका तांबड्या लांबट शिळेवर खोल व मोठ्या अक्षरात कोरलेला आहे. शिळा ओबड धोबड असून तिच्यावर अनेक ठिकाणी ओरखडे व खाचा उमटलेल्या आहेत. त्यामुळे लेखाच्या वाचनात अनेक विकल्प निर्माण होतात. लेखाच्या एकूण १५ ओळी असून प्रत्येक ओळीत पाच सहा किंवा क्वचित् सात अक्षरे आहेत. अक्षरे मोठी असली तरी आता अस्पष्ट झाली आहेत. तरी ती धडपणे वाचता येतात हे आपले सुदैवच. लेख येथे प्रथमतःच व संपूर्ण प्रसिद्ध होत आहे.

## ३ लिपी व भाषा

लेखाची लिपी देवनागरी आहे, व तीत यादवकालीन लिपीची वैशिष्ट्ये फारशी आढळून येत नाहीत. पृष्ठमात्रा नाहीतच. परंतु ' ण ' चे ल सारखे वळण व ' ब ' चे ' घ ' सारखे वळण निःसंशय प्राचीन आहे.

भाषा मराठी आहे. आणि मराठी भाषेच्या अभ्यासाचे दृष्टीने हा लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. लेखातील अष्टमी साठी ' अठी '; शनिवार साठी ' सणिवार ' आणि ' दीले ' ही रूपे चिंत्य आहेत.

परंतु कोरक्याने लेख अत्यंत निष्काळजीपणे कोरला असावा हे स्पष्ट दिसते. काही ठिकाणी त्याने काना आणि मात्राही गाळल्या आहेत. उदाहरणार्थ पुढील स्थळे पहा :

| वाचन ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| १ | सकु | शके. |
| ५ | सणिवार | शनिवार |
| १५ | चांडलु | चांडालु. |

—यावरून लेखातील अशुद्धांचे स्वरूप लक्षात येईल. असो.

## ४ कालोल्लेख

प्रस्तुत लेखात ओळ १ते ५ मध्ये लेखाचा काळ दिला आहे तो असा :

' स्वस्ति श्री सकु १००२ रौद्र संवत्सरे आषाढ मासे अठि सणिवार ' ( ओळ १ ते ५ )

अर्थात् शक १००२ रौद्रसंवत्सर या वर्षातील आषाढ महिन्यातील शुक्ल किंवा कृष्ण पक्षातील शनिवारयुक्त अष्टमी ही शिलालेखात अभिप्रेत आहे असे दिसते हे निश्चित.

परंतु पूर्वी सांगितल्याप्रमाणे शिळेवर खाचा पडलेल्या असल्यामुळे शिलालेखाच्या वाचनात विकल्प उद्भव-








तात त्यामुळे वरील कालोल्लेख दोन प्रकारे वाचता येतो. तो असा.

(अ) स्वस्ति श्री सकु १००२ रौद्र संवत्सरे आषाढमासे अठि सणिवार.

(ब) स्वस्ति श्री सकु १०६२ रौद्रसंवत्सरे आषाढमासे अठि सणिवार.

—व यामुळे लेखाचा काळ नेमका साठ वर्षे पुढे ढकलला गेल्यामुळे रौद्रसंवत्सर ह्या संवत्सर नामाचाही काल ठरविण्यास उपयोग होत नाही. कारण दर साठ वर्षांनी तीच संवत्सर नामे येतात.

परंतु आमचे असे आग्रहाचे प्रतिपादन आहे की 'स्वस्ति श्री सकु १००२ रौद्र संवत्सरे' हेच वाचन बरोबर आहे. कारणे अशी :

(अ) स्वस्ति श्री सकु १०६२ हे वाचन १००२ ह्या अंकातील दुसऱ्या शून्याखाली जी खाच किंवा ओरखडा पडला आहे त्यामुळेच संभवते त्यामुळे दुसरे शून्य सहा या अंकासारखे दिसते परंतु सहा या अंकाचे हे वळण योग्य वाटत नाही ते ६ असे दिसते परंतु सहाच्या खालचा हा भाग शिळेवरील ओरखडा मानला तर शक १००२ हे वाचन सुव्यवस्थित जमते.

(ब) परंतु ह्यापेक्षाही बलवत्तर प्रमाण म्हणजे लेखातील मास व वार यांचा उल्लेख आहे. तो असा : आषाढमासे अठि सणिवार' असा आहे. यात आषाढ मासातील शुक्ल अथवा कृष्ण पक्षातील अष्टमी अभिप्रेत आहे. व त्यादिवशी शनिवार हा वार येथे आवश्यक आहे. पिल्ले जंत्री प्रमाणे शके १००२ च्या आषाढ महिन्यात वद्य अष्टमीस शनिवार बरोबर येतो.[१]

अर्थात् शके १००२ रौद्र संवत्सर आषाढ मास (कृष्णपक्ष) अष्टमी शनिवार हा काळ ह्या शिलालेखाचा काळ ठरतो. ह्याला आणखी प्रमाणे पुढे दाखविण्यात येतीलच.

## ५ राजवट

लेखाच्या ५ व्या व ६ व्या ओळीत 'महाकुमार श्री सिंघणदेवे हा उल्लेख आला आहे. हा सिंघण देव कोण ?

सर्वप्रथम एक गोष्ट लक्षात येते ती अशी की हा सिंघणदेव म्हणजे सुप्रसिद्ध पराक्रमी सम्राट् सिंघणदेव यादव देवगिरीकर होऊ शकत नाही. कारण सम्राट् सिंघणदेवाचा काळ शके ११२१ ते शके ११६९ असा आहे. आणि यातील प्रारंभीची दहा वर्षे त्याच्या युवराज पदाची असूनही अगदी प्रारंभापासूनच त्याच्या नावामागे समस्तभुवना–श्रय पृथ्वीवल्लभ महाराजाधिराज यादव कुलकमलकलिका विकास भास्कर इत्यादि विशेषणे लावलेली आढळून येतात.[२] अर्थात् देवगिरीचा हा पराक्रमी यादव सम्राट इथे अभिप्रेत नाही हे नक्की.

दुसरा सिंघणदेव आपल्या डोळ्यासमोर येतो तो म्हणजे कलचुरि सिंघणदेव. हा कलचुरि बिज्जलाचा पुत्र शके ११०५ मध्ये हा राज्यावर आला आणि त्याच वर्षी पश्चिमचालुक्यांचा मांडलिक बनला. अर्थात् त्याचा अंमल बीड-उस्मानाबाद भागावर असणे स्वाभाविक आहे. इतकेच नव्हे तर ह्याच सिंघणदेवाचा एक लेख खुद्द अंबाजोगाई येथेच संगीत मशीद नावाने ओळखल्या जाणाऱ्या मशिदीत मिळाला आहे आणि तो डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी संपादिला आहे.[३]

परंतु प्रस्तुत शिलालेखातील सिंघण देव हा कलचुरि सिंघणदेव असणेही शक्य नाही. कारणे अशी :

(अ) चनई शिलालेखाचा काळ शके १००२ किंवा शके १०६२ कसाही धरला तरी तो कलचुरि सिंघण देवाच्या शके ११०५ ह्या बेहट्टी ताम्रपटाने सिद्ध होणाऱ्या काळाशी जुळत नाही.[४]

(ब) शिवाय हा संगीत मशीद शिलालेख अपूर्ण व कालरहित असून तो कलचुरि सिंघणाचा असल्याबद्दल बलवत्तर प्रमाणे उपलब्ध नाहीत. त्याबद्दल आपण पुढे विचार करणार आहोतच. असो.

शेवटी आपण अशा निष्कर्षावर येतो की प्रस्तुत शिलालेखातील सिंघणदेव हा सेऊणदेशकर सिंघणदेव यादव हा असावा. सेऊणदेशकर यादवांची कामापुरती वंशावळ अशी.[५]

१. Rao Bahadur Swamikanu Pillai. An Indian Ephemeries III. 162
२. ग. ह. खरे, दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने. भाग २ पृष्ठ ६२
३. डॉ. शं. गो. तुळपुळे. प्राचीन मराठी कोरीव लेख लेख. क्रमांक ६७.
४. Indian Antiquerry IV. 274
५. R. G. Bhandarkar, Early History of Deccan.










सेऊणचंद्र द्वितीय ( वसई ताम्रपट व वाघळी शिलालेख शके ९९१ )

एरम्मदेव किंवा पेरम्मदेव (अशवी ताम्रपट शके १०२०)

सिंघणदेव (प्रस्तुत शिलालेखात उल्लेखित शके १००२

सेऊणदेशकर यादव हे कल्याणी चालुक्यांचे मांडलिक होते. कल्याणी चालुक्याचे राज्यही बीड-उस्मानाबाद याच भागात होते. अर्थात् त्यांच्या मांडलिकांचे शिलालेख ह्या भागात सापडणे स्वाभाविक आहे. परंतु त्यातही एक अडचण शिल्लक रहातेच व ती अशी– सेऊणचंद्र द्वितीय ह्यास पुत्र दोन. मोठा एरम्मदेव ( इरम्मदेव किंवा पेरम्मदेव) ह्याचा अशवी ताम्रपट उपलब्ध असून तो शके १०२० चा आहे. अर्थात् मोठ्या भावाचा लेख शके १०२० चा व लहान भावाचा मात्र शके १००२ चा हे कसे शक्य आहे ?

परंतु त्याही प्रश्नाची सोडवणूक समाधानकारक रीतीने सेऊणदेशकर यादवांचे आतापर्यंत पुढील लेख उपलब्ध व प्रकाशित झाले आहेत.

( अ ) महासामंत भिल्लम द्वितीय ह्याचा शक ९२२ चा संगमनेर ताम्रपट.[१]

( ब ) महासामंत भिल्लम तृतीय ह्याचा शक ९४४ चा कळसबुद्रुक ताम्रपट[२]

( क ) महामंडलनाथ सेऊणचंद्र द्वितीय ह्याचा शक ९९१ चा वसई ताम्रपट[३] व त्याच वर्षाचा वाघळी शिलालेख.[४]

( ड ) महामंडलेश्वर ईरम्मदेव ह्याचा शक १०२० चा अशवी ताम्रपट.[५]

( इ ) महासामंत सेऊणदेव तृतीय ह्याचा शके १०६३–६४ चा अंजनेरी शिलालेख.[६]

ह्या शिलाताम्रशासनांवरून आपणाला सेऊणदेशकर यादवघराण्याचा अभ्यास करता येतो.

देवगिरीकर यादवांचा श्रीकरणाधिप हेमाद्रिपंडित याने आपल्या ‘ व्रतखंड ’ नामक ग्रंथातही सेऊण-देशकर यादवांची वंशावळ दिली आहे. त्यातही त्याने एरम्मदेवास सिंघणाचा मोठा भाऊ म्हटले आहे असो.

ह्या शिलाताम्रशासनांचे आधारे पुढील निष्कर्ष निघू शकतात. ते असे :

( अ ) महासामंत द्वितीय भिल्लम ह्याचा काळ शक ९२२ हा नक्की होतो.

( ब ) महासामंत भिल्लम तृतीय ह्याचा काळ शके ९४४ हा नक्की होतो.

( क ) महामंडलनाथ सेऊणचंद्र द्वितीय ह्याचा काळ शके ९९१ हा नक्की होतो.

( ड ) सेऊणचंद्र द्वितीय ह्यास पुत्र दोन. पैकी थोरला इरम्मदेव, एरम्मदेव, किंवा पेरम्मदेव व धाकटा सिंघणदेव सेऊणचंद्र द्वितीय ह्याचा काळ शके ९९१ असता एरम्मदेवाचा अशवी ताम्रपट शके १०२० चा असावा हे स्वाभाविक व योग्यच आहे. पण मग सिंघणाचा प्रस्तुत लेख शके १००२ चा कसा ? ह्या प्रश्नाचे उत्तर असे की प्रस्तुत लेखात सिंघणाला केवळ महाकुमार ही पदवी लावली आहे. महासामंत ही त्याच्या घराण्याची पदवी लावलेली नाही. तेव्हा निष्कर्ष असा काढता येईल की इरम्मदेव हा महासामंत असतानाच त्याचा हा धाकटा भाऊ महाकुमार ह्या नात्याने बीड-अंबाजोगाई भागात प्रशासकीय कामकाजाचा अनुभव घेत असावा. उमेद-वारी करीत असावा; व राजघराण्यातील पद्धतीला हे धरून आहे व योग्य आहे.

१. Journal of Bombay Branch of Royal Asiatic Society ( New Series) III. 189

२. Epigraphia Indica II. 217

३. Indian Antiquerry XVII. 120

४. Epigraphia Indica II. 225

५. Indian Antiquerry XII. 119

६. Indian Antiquerry XII 126

(इ) शिवाय हा शिलालेख जर शके १०६२ चा धरला तर आणखी तीन अडचणी निर्माण होतील त्या अशा :

क सेऊणचंद्र द्वितीय ( शके ९९१ ) आणि सिंघणदेव प्रथम ( शके १०६२ ) ह्या दोनच पिढ्यात ६०–७० वर्षांचे अंतर पडेल. व ते अशक्य नसले तरी स्वाभाविक नाही.

ख जर हा लेख शके १०६२ चा मानला तर मग सेऊणचंद्र तृतीयच्या शके १०६३-६४ च्या अंजनेरी शिलालेखाची संगति कशी लावावयाची म्हणजे चनई शिलालेख हा सिंघण प्रथमचा अगदी शेवटचा शिलालेख आणि अंजनेरी शिलालेख हा सेऊणचंद्र तृतीयचा अगदी पहिला शिलालेख मानावा लागेल अर्थात् ते शक्य होणार नाही.

ग आणि जर चनई शिलालेख हा शके १०६२ चा मानला तर शके १०६२ मध्ये चनई जवळच अंबाजोगाईस उदयादित्यदेवाचे शासन होते[१] त्याची संगति लावता येणार नाही. अर्थात् आतापर्यंतच्या विवेचनाचे निष्कर्ष हे खालील प्रमाणे मांडता येतील :

अ. प्रस्तुत लेखाचा काळ निःसंशयपणे शके १००२ रौद्रसंवत्सर हा आहे.

ब. तो सेऊणदेशकर सिंघणदेव यादवाचे काळास जुळतो.

क. हा काळ सेऊणदेशकर यादवाचे वंशावळीस बाधक ठरत नाही.

ड. ह्या काळात सेऊणदेशकर सिंघणदेव हा बीड–अंबाजोगाई भागात महाकुमार म्हणून काम पहात होता.

### ६ व्यक्तिनामे

ह्या शिलालेखात एकच व्यक्तिनाम येते व महाकुमार सिंघणदेव ह्याचे; व त्याबाबतीत विस्तृत विवेचन वर आलेच आहे.

### ७ स्थलनामे

ह्या लेखात ओळ ६ व ७ मध्ये 'अंबादेसी' हे स्थलनाम आले आहे. अंबादेश म्हणजे सध्याचे अंबाजोगाई आणि त्याचे आसपासचा प्रदेश हे तर सहज सिद्ध आहे. परंतु मराठीचे आद्यकवि मुकुंदराज ह्यांच्यामुळे प्रस्तुत स्थळास महत्त्व प्राप्त झाले असल्यामुळे या स्थलनामाबद्दल थोडे विवेचन करणे प्राप्त आहे.

( अ ) योगेश्वरी माहात्म्य हा अंबाजोगाईचे स्थल-माहात्म्य सांगणारा ग्रंथ. ग्रंथात अंबाजोगाईला जयंती–नगरी असे म्हटले आहे पण ते जयंतपाळाची नगरी म्हणून जयंती नगरी असे बनावट वाटते ह्याच ग्रंथात ह्या नगरीला अंबे असेही म्हटले आहेच.

( ब ) अंबाजोगाई येथेच प्राप्त झालेल्या चौबारा शिलालेखांत ह्या नगरास 'आम्रपुर' असे म्हटले आहे.[२] हे आंबे ह्या ग्रामनामाचे संस्कृत रूप दिसते.

( क ) अंबाजोगाई येथेच प्राप्त झालेल्या सकळेश्वर देवळातील शिलालेखात ह्या नगरास 'आंब्रपुर' असे म्हटले आहे.[३] व तेही आंबे ह्या ग्रामनामाचे संस्कृत रूप दिसते.

( ड ) सकळेश्वर मंदीर शिलालेखातील मराठी मजकुरातही 'आम्रदेशे लघुबाऊची ग्रामदत्त' असा उल्लेख आहे.

( इ ) यानंतर शक १२०० इ. स. च्या सुमारास लिपिनिविष्ट झालेल्या 'लीळाचरित्र' ह्या महानुभाव ग्रंथात ह्या गावाचा उल्लेख 'खोरु नायकाचे आंबे' असा आला आहे. त्यावेळी हा गाव देवगिरीकर यादवाचा सुप्रसिद्ध वैदर्भीय ब्राह्मण सेनापति खोलेश्वर ह्याचे जहागिरीचा गाव होता. जहागिरदाराचे नावावरून गावाचे नामकरण करण्याची रीत प्राचीन असून सर्वत्र आढळते. 'विज्जलाचे बीड, ' 'अनंतपालाचे शिऊर' ही अंबाजोगाईच्या आसपासचीच गावे पहा अशी अनेक उदाहरणे दाखवता येतील.

( फ ) यानंतर अंबाजोगाई येथेच प्राप्त झालेल्या खोलेश्वर मठ शिलालेखातही 'आम्रपुर' असाच उल्लेख आला आहे.[४] अर्थात् ह्या सगळया उल्लेखांवरून

१. डॉ. शं. गो. तुळपुळे. प्राचीन मराठी कोरीव लेख. लेख क्रमांक ५
२. श्री. ग. ह. खरे. दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने भाग १ पृ. ५५–७०
३. कित्ता. पृष्ठ ६५
४. डॉ. शं. गो, तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख. क्रमांक ३४ पृष्ठे १६४–१९०



अनुक्रमणिका






एक गोष्ट लक्षात येते ती ही की, 'अंबा' हे स्थलनाम आंबा ह्या फलविशेषापासून सिद्ध झाले असून त्याचा देवीशी संबंध नाही. आणि एरव्हीही 'अंबाजोगाई' ह्या शब्दात प्रथमपदाचा अर्थ 'देवी' असा घेतला तर द्विरुक्तीचा दोष पदरी येतो. गावाचे प्रचलित नावही जोगाईचे अंबे असे आहे असो. जाता जाता आणखी एक गोष्ट नजरेस आणावींशी वाटते. पंढरपूर येथील चौऱ्यांशीच्या लेखातही स्तंभ १ ओळ २५ मध्ये 'आंबेकारा दोढपंडितु ग १ दांडा १ फु २२' व स्तंभ १ ओळ ३९ मध्ये 'आंबकारे क्रिष्ट देवे दा ग १ दे फूले ३०' असा अंबा येथील दोन व्यक्तींचा निर्देश आला आहे.

या लेखातील दुसरे स्थलनाम ओळ क्र. ९ मध्ये आले असून ते 'छनैग्राम' असे आहे. छनैग्राम म्हणजेच प्रस्तुत लेखाचे उपलब्धिस्थल चनई नावाचे गाव होय.

## ८ सेलवन

प्रस्तुत शिलालेखात ओळ ८-९ मध्ये 'सेलवन दीले' असा उल्लेख आहे. अंबाजोगाई येथील उदयादित्याचे शिलालेखातही 'शालिवन दांडेआची निर्क्तने' असा शब्दप्रयोग आला आहे.[१] अर्थात् ह्या शालिवन किंवा सेलवन ह्या शब्दप्रयोगाचे अर्थनिर्णयदृष्ट्या विवेचन करणे आवश्यक आहे. ह्या 'शालिवन दांडा' शब्द-प्रयोगाचे आतापर्यंत अनेक अर्थ सुचविण्यात आले आहेत ते असे :

(अ) डॉ. तुळपुळे ह्या शब्दाचा अर्थ तांदळाचे शेत असा करतात.

(ब) डॉ. दीक्षित ह्यांचे मते हा अर्थ म्हणजे तांदळाचे दाट रोपे पेरलेले खाचर.

(क) श्री. भा. रं. कुलकर्णी ह्यांचे मत असे की शालिवन दांडा म्हणजे शालिवाहनाने सुरू केलेले भू परिमाण.

(ड) तर श्री. खरे. यांचे मते शालिवनदांडा हे भूपरिमाण शालिवन नावाच्या ग्रामनामापासून रूढ झाले आहे.[२]

परंतु ही मते ग्राह्य होण्यासारखी नाहीत. कशी ती पुढे दाखविली आहेत.

(अ) डॉ. तुळपुळे आणि डॉ. दीक्षित यांचे मते हे भूपरिमाण तांदळाच्या शेतावरून रूढ झाले परंतु साधी गोष्ट अशी की तांदुळाचे शेताचे मापाने फक्त तांदळाचे शेतच मोजता येईल. इतर शेते नाहीत. आणि जोपर्यंत उदयादित्याचे लेखांतील किंवा प्रस्तुत लेखातील दान दिली गेलेली शेते ही तांदुळाचीच होती असे सिद्ध होत नाही. तोपर्यंत वरील विधान लंगडेच रहाणार.

(ब) तिसरे मत श्री. भा. रं. कुलकर्णी यांचे आहे. पण शालिवाहन राजाने कोणतेही भूपरिमाण सुरू केल्याचे सिद्ध नाही. आपण जी कालगणना शालिवाहन शक म्हणून वापरतो तीही शालिवाहनाने सुरू केलेली नाही. तसे असते तर त्याने सुरू केलेल्या भूपरिमाणांचा किंवा कालगणनपद्धतीचा उपयोग शालिवाहन राजांच्या नाणेघाट नाशिक जुन्नर आदि ठिकाणच्या लेखात केला गेलेला जरुर आढळला असता, पण तसे दिसून येत नाही. म्हणून श्री. भा. रं. कुलकर्णी यांचे हे मत ग्राह्य नाही.

(क) शेवटचे मत श्री. ग. ह. खरे यांचे आहे. परंतु शालिवन म्हणजे कोणते गाव ? त्या गावापासून भूपरिमाण कसे रूढ झाले हे भूपरिमाण इतरत्र न आढळता अंबाजोगाई आणि आसपासच्या परिसरातच का वापरले जाते ? वगैरे प्रश्नांची समाधानकारक उत्तरे मिळाल्याशिवाय त्यांचे मत ग्राह्य धरता येणार नाही.

आमचे मते हा शब्द 'सेलवन' असा आहे. व प्रस्तुतच्या लेखातही तो तसाच वापरला आहे. आणि त्याचा अर्थ शैलवन (शैल = पर्वत) किंवा पर्वताच्या उतरणीवरील जमीन किंवा थोडक्यात म्हणजे माळरान असा असावा.

## ९ आशय

प्रस्तुत लेखाचा आशय म्हणजे शके १००२ मध्ये आषाढ (वद्य) अष्टमी शनिवार या दिवशी महाकुमार सिंघण देवाने सोमेश्वर देवास सेलवन दान दिले. गुरवा-लाही भूमि दिली. हे दान जो फेडील तो कुत्रा, गर्दभ आणि चांडाळ होय असा शापही शेवटी दिला आहे. हे दान अष्टमीला दिले गेले हे योग्यच आहे. कारण

१. कित्ता लेख क्रमांक ५ पृष्ठे २८–६४

२. वरील सर्व मते डॉ. तुळपुळे ह्यांच्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' ह्या ग्रंथातील पृष्ठ ३३-३४ वरून उद्धृत केली आहेत.












अष्टमी व्रत हे एक महत्त्वाचे व्रत आहे. ही व्रते सुमारे तीस आहेत. शुक्ल पक्षातील नवमीयुक्त अष्टमी व वद्य पक्षातील सप्तमीयुक्त अष्टमीस ही व्रते करितात.[१] अष्टमीला महिषासुरमर्दिनीची पूजाही करतात. आषाढ शुद्ध अष्टमी ही दुर्गाष्टमी व वद्य अष्टमी ही कालाष्टमी म्हणून ओळखली जाते. अंबाजोगाईचे परिसरात ह्या तिथ्यांचे महत्त्व असणारच ह्याच तिथीला श्री सिंघण-देवाने सोमेश्वरास दान दिले आहे.[२]

## १० चर्चा

प्रस्तुत शिलालेख हा अनेक दृष्टींनी महत्त्वाचा ठरतो.

( अ ) हा शिलालेख मराठी भाषेतील अत्यंत प्राचीन लेखांपैकी ठरतो.

जर डॉ. मिराशी यांचे नवीन मत ग्राह्य धरले तर दिवे-आगर ताम्रपट हा मराठीचा आद्यलेख मानला जाईल.[३] व द्वितीय क्रमांकाचा मान प्रस्तुत शिलालेखासच मिळेल.

( ब ) सेऊणदेशकर यादवांचा हा खानदेशाबाहेर उपलब्ध झालेला पहिलाच शिलालेख होय. त्यांचे ताम्रपट मात्र वसई अशवी आदि ठिकाणी कोंकण प्रदेशात सांपडले आहेत.

( क ) सेऊणदेशकर सिंघणाचा हा पहिलाच उपलब्ध लेख आहे.

( ड ) हा अत्यंत प्राचीन असा मराठी लेख असल्यामुळे मराठी भाषेचे अभ्यासकांस तो निःसंशयपणे उपयुक्त ठरेल ह्यात शंका नाही.

( इ ) ह्या शिलालेखामुळे कलचुरि सिंघण देवाच्या अंबाजोगाई येथील संगीत मशीद शिलालेखावर[४] व उदयादित्य देवाच्या अंबाजोगाई शिलालेखावरही[५] नवीन प्रकाश पडतो.

कलचुरि सिंघणदेवाचा हा अंबाजोगाई शिलालेख तेथील संगीतमशीद म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मशिदीत एका खांबावर कोरलेला आहे. लेख अपूर्ण असून कालरहित आहे. ह्या लेखात सिंघणदेवाचा उल्लेख असून त्याचा पट्टसाहणि दावरस ( दोचरस ह्याचा पुत्र ) ह्याने देऊळ बांधल्याचा उल्लेख आहे. हा सिंघण देव म्हणजे कलचुरि सिंघण देव असा तुळपुळे यांचा तर्क आहे. त्याला कारणे ते अशी देतात :

( अ ) यातील दोचरस व दावरस ह्यांचे सारखी रस पदान्त नामे कलचुरि बिज्जलाचे लेखातही आढळतात. त्याचा दंडनायक महादेवरस नामक असून ह्या महादेवरसाचे करणिक पोटरस छड्डिमरस पद्मरस व सोवरस नावाचे आहेत अर्थात ही ' रस ' पदान्त नामे कलचुरी घराण्याशी साहचर्य दाखवतात.

पण हे मत ग्राह्य होणारे नाही. कारणे अशी—

( अ ) केवळ अधिकाऱ्यांचे नावावरून एखाद्या राजकुलासंबंधी तर्क करणे युक्त होणार नाही. खुद्द यादवांचेही अनेक अधिकारी कर्नाटकी होते. उदा. बीचण; मल्लिशेटि आदि म्हणून यादव कर्नाटकातील होते असे म्हणणे युक्त होणार नाही.

( ब ) दुसरे असे की कलचुरि सिंघणाचा ' महामंडलेश्वर ' म्हणून उल्लेख असलेला एकही अन्य शिलालेख व ताम्रपट उपलब्ध नाही. केवळ हाच एक लेख आहे.[६] म्हणून केवळ ह्या एका लेखाचे आधारावर तोही अपूर्ण व कालरहित आणि केवळ अधिकाऱ्याचे नावावर विसंबून राहून संगीत मशीद लेख[७] हा कलचुरि सिंघणाचा ठरविणे योग्य होणार नाही. अधिकाऱ्याची नावे बहुधा प्रदेशवैशिष्ट्यांवर अवलंबून असतात त्यांच्या शासकांवर नव्हे.

तेव्हा आमचे असे स्पष्ट मत आहे की हा संगीत मशीद शिलालेख कलचुरि सिंघणदेवाचा नसून सेऊण-देशकर सिंघणदेव यादव ह्याचाच असावा. प्रस्तुतचा चनई शिलालेख आपण निःसंशयपणे त्याचा ठरविलाच आहे. अर्थात् जवळच्याच तीन मैलावरील अंबा-

१. पंडित महादेवशास्त्री जोशी. भारतीय संस्कृती कोश खंड १ ला पृ. ३१५
२. कित्ता. पृ. ५१६
३. डॉ. वा. वि. मिराशी. मराठी साहित्य पत्रिका. डिसेंबर १९६८
४. डॉ. शं. गो. तुळपुळे. प्राचीन मराठी कोरीव लेख. लेख. क्र. ५६७
५. कित्ता. लेख. क्रमांक ५
६. कित्ता. पृष्ठ. ३५४
७. डॉ. शं. गो. तुळपुळे, प्राचीन मराठी कोरीव लेख. लेख क्रमांक ५ पृष्ठ ३४










जोगाईचा शिलालेखही त्याचाच असावा हे स्वाभाविक वाटते व कलचुरि सिंघणदेवाचा महामंडलेश्वर असा उल्लेख असलेला अन्य एकही लेख उपलब्ध नसता संगीत मशीद शिलालेख केवळ अधिकाऱ्यांचे नावावरून त्याचा ठरविणे अशक्य नसले तरी स्वाभाविक वाटत नाही.

आता उदयादित्य देवाचे अंबाजोगाई शिलालेखाकडे वळू. ह्या शिलालेखात ओळ क्रमांक ६–७ मध्ये ' सिंघणदेवांजवळ गावी भूमि दत्त ' असे शब्द आले आहेत. आणि त्या ठिकाणी सिंघणदेव ही कोणी सामान्य व्यक्ति आहे असा श्री. ग. ह. खरे यांचा तर्क आहे.

परंतु सामान्य व्यक्तींच्या नावावरून ग्रामनाम ओळखले जाण्याची शक्यता कमी असते. अंबाजोगाई परिसरात तर ग्रामनाम हे जहागिरदाराचे नावावरून ओळखले जाई हे आपण पाहिलेच आहे. तेव्हा आमचा निष्कर्ष असा की अंबाजोगाई जवळचे हे सेऊणदेशकर यादव महाकुमार सिंघणदेवाचे जहागिरीचेच गांव असावे व त्याचे नावावरूनच ' सिंघणदेवाचे जवळगाव ' हे नाव पडले असावे. जसे ' खोल नायकाचे अंबे ' व तेच नाव पुढे प्रचारात राहिले असावे.

## ११ संदर्भग्रंथ


१. डॉ. शं. गो. तुळपुळे : प्राचीन मराठी कोरीव लेख.

२. श्री. ग. ह. खरे : दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने खंड १ व २

३. इंडियन अँटीक्वेरी

४. एपिग्राफिया इंडिका.

५. जर्नल ऑफ बॉम्बे ब्रँच ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी.

६. भारतीय संस्कृतिकोश.

७. मराठी साहित्य पत्रिका.


## १२ वाचन

ओळ

१. स्वस्ति श्री सकु
२. १००२ रौद्र सं
३. वत्सरे आषा
४. ढ मासे अठि
५. सणिवर अं
६. बे देसि महा
७. कुमार श्री सिंघ
८. ण देवे सेलवन
९. दीले छनै ग्रामे
१०. सोमेस्वरास ( क्षे )
११. त्र भुमि गु. ३०
१२. गुरवास मध्ये
१३. दाना जो फेडि
१४. तो स्वनु गर्द.
१५. भु चां डलु.

---












डॉ. सौ. कमल गोखले

# कविकलश*

संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत कविकलश याचा प्रामुख्याने उल्लेख येतो. संभाजी राजांशी अनेकजण एकनिष्ठ होते. अशाच स्वामिनिष्ठ सेवकात कविकलशाची गणना करावी लागेल. कविकलशासंबंधी अनेक गैरसमजुती प्रचलित आहेत. काव्यातून, बखरीतून, त्याच्याविषयी बराच विपर्यास केलेला दिसतो. कविकलशाला कबजीबाबा, कलुशाकबजी म्हणून म्हणत असत. काही ठिकाणी त्याला कलीचा अवतार समजून शिवाजी महाराजांनी सुरू केलेल्या राज्याचे व धर्मसंस्थापनेचे उच्छेदन करण्याकरिताच तो प्रकट झाला होता असेही म्हटले आहे. काही जुन्या लेखांचा रोख असा होता की कलुशा हा औरंगजेबाकडून संभाजी राजास भ्रष्ट करण्याकरिता व कुमार्गास लावून, त्यास धरून बादशहाचे स्वाधीन करण्याकरिता विडा उचलून आला होता.

मल्हार रामराव चिटणीस बखरीत कविकलशाविषयी खालील माहिती दिली आहे : " कवि कलुषा कबजी म्हणोन कनोजी ब्राह्मण बहुत विद्वान, मंत्रशास्त्र विद्या आगम त्यास बहुत गम्य, असे होते. त्याची स्त्रीही चतूर होती. त्यांणी महाराज वश करावे म्हणून वशीकरण मंत्रप्रयोग करून महाराजांची बहूत जवळीक व कृपा संपादून अगोदर समीप राज्याभिषेकापूर्वी होतेच. वशीकरण-मार्गाविशी अनुष्ठाने प्रयोगसंपत्तीकारणे व राज्यवृद्धी होणे, यश येणे असे समजावून प्रयोग अनुष्ठान करविले. पुढे दिवसेंदिवस बुद्धीस भ्रंश पडून त्या मार्गात अनुसरावे असे केले. रेडे मारून त्यांचे ओले कातड्यावर अनुष्ठाने व मद्यमांस पशुवधाची बहूत, करु लागले. ब्राह्मणापासून प्रयोग करविणे यांत महाराजांचे अंतःकरण बहूत व्याप्त जाहले. कोणी हे करणे युक्त नव्हे असे बहुत सांगून कळविले असता त्यासच दरबार मना करून कैद करावे, असे होऊ लागले."[१] वर दिल्याप्रमाणे इतरही बखरीत कविकलशाविषयी असेच वर्णन केलेले आढळते. बखरीच्याच आधारे लिहिलेल्या संभाजीराजे यांचेवरील नाटकातही संभाजीला दारू आणि इतर व्यसनांच्या स्वाधीन करणारा एक सूत्रधार म्हणून कविकलशाचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे. एका नाटकात त्याला मुख्यप्रधानपदही अर्पण करण्यात आलेले आहे. तुळशी आणि संभाजी यांच्या व्यभिचाराला उद्युक्त करणारा, कपट वृत्तीने संभाजीला संगमेश्वरला आणून मोगलांच्या स्वाधीन करून देणारा खलपुरुष म्हणून तो रंगविलेला आहे. ईश्वरदास नागर, निकोलाओ मानुत्ची, रॉबर्ट ऑर्म या समकालीन लेखकांनी कलशाने फितुरी केली असे आरोप केलेले आहेत.

परशुराम चरित्रात कविकलशाविषयी खालील उल्लेख केलेले आहेत.

"पाछा पासोनी मंत्रशास्त्री कवजी आला नृपा आश्रये। संभाजीवर मोहोमंत्र पडता दुर्बुधी झाला वस्ये। मंत्री मुख्य करूनि तोचि कवजी होणार इच्छा हरी।"[२] संभाजी महाराजांच्यावरील एका पोवाड्यात कविकलशाचे वर्णन आढळते : "संभाजी राजा राज्य करू लागला ॥ कबजी बावास कारभार दिधला ॥ तेणे मोगल संतोषला ॥ येऊन पुण्यात बैसला ॥ मोगले हीकमती जे केली विलाती वोस पाडिली ॥ वापडी मावळे गड टाकून पळाली। यकापुढं यक पळती गडापुढं गड सांडिती ॥ बापडी हवालदारे सबनिसे दीने होती ॥ यैसी गडाची गति। तैसीच घोड्याराऊताची व्याती। पंच हजारीस पांच तटे उरती ॥ बावाने केले बावापण ॥ राज्य बुडवीले आपण ॥ बांधोन दील्हे संभाजी तुज जाण ॥"[३] हा पोवाडा अपूर्णच आहे.

वहिरो विठ्ठल लोणकर याच्या चाकरीच्या संदर्भात कवि-कलशाचा संबंध आला होता. तुकोजी

---

* ('सिंहाचा छावा' या आगामी प्रकाशनातून.)

१. मल्हार रामराव चिटणीस विरचित – संभाजी राजे यांचे चरित्र – पृ. ९

२. ताराबाईकालीन कागदपत्रे, क्र. ३, पृ. १४.

३. ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास सं. य. न. केळकर, पृ. ३३८.










कृष्ण लोणकर हा वाडवडिलांपासून शिवाजीमहाराजांकडे नोकरीस होता. हा बारा मावळचा मुजुमदार होता. नोकरीत असता तुकोजीने बराच पसा खाऊन तो श्रीमंत झाला. अण्णाजी दत्तो कमाविसदार आपल्याकडे केव्हातरी पहाणीस येईल या भीतीने तो संपत्ती झाकून असे. अण्णाजी दत्तो एकदा फिरत फिरत मावळात गेला. त्यावेळी तो तुकोजीच्या घरी गेला. तुकोजीने अण्णाजीला मेजवानी दिली. आपली संपत्ती न झाकता त्याचे प्रदर्शनच केले. अण्णाजीने जेवण झाल्यावर त्याचे घर जप्त केले. यासंबंधी अण्णाजीने सर्व माहिती महाराजांना कळविली. शिवाजी महाराजानी त्याची सर्व मालमत्ता घेऊन तुकोजीला बोलाविले. त्याला चाळीस हजार खंड बसवून त्याचा रोजगार बंद करून त्यास वाराणशीस जाण्यास सांगितले. यात्रेला जाताना तुकोजीने महालचा मोहसबा बहिरो विठ्ठलाकडे दिला. तुकोजीपंत यात्रेला गेला असता शिवाजी महाराज मरण पावले.

संभाजी महाराज राज्य करू लागताच बहिरो विठ्ठल लोणकर हा एक ब्राह्मण व दोन माणसे घेऊन दरबारात गेला. त्याने पेशवे, सुरनीस, अष्टप्रधान, यांच्याकडे रोजगारासाठी विनंती केली. तेव्हा ते त्याला म्हणाले की, "या राज्यात काही रदबदल चालत नाही. अवघी रदबदल कविकलस कबजीबाबा यांजकडे जाली आहे. त्याकडे जाणे. त्याचा उपार्जना करणे ते रोजगार सांगतील." परंतु कविकलशाने, जो रोजगार मागावयास येईल त्याने आपणास येऊन भेटावे. आपण त्यास प्रायश्चित्त देऊन आपले पंक्तीस आपले बायकोचे हाते भोजन घालावे. मग त्यास रोजगार घालावा, अशी प्रथा पाडली होती. हा करार ऐकून बहिरो विठ्ठल कबजीकडे गेला नाही. संभाजी महाराज गांगोलीस जाण्यास निघाले तेव्हा बहिरो विठ्ठलने त्यांची घाटात गाठ घेतली, आणि रोजगार मिळविण्याची खटपट केली.[१]

त्या काळी महाराष्ट्रीय ब्राह्मण तद्देशीय ब्राह्मणांना कमी लेखीत असत. कविकलश हा कनोजी ब्राह्मण असल्यामुळे त्याच्याशी महाराष्ट्रीय ब्राह्मण सहभोजन करीत नसावेत. याच्यातून दिसून येणारा स्वतःचा कमीपणा नाहीसा करण्यासाठी जो ब्राह्मण नोकरी मागण्यास येईल त्याला प्रायश्चित्त देऊन आपल्या पंक्तीस भोजन देऊन त्यांना आपल्यासारखे करण्यासाठी कविकलशाने वरीलप्रमाणे करार केला असावा.

कविकलश शाक्त पंथाचा होता. त्याला मुख्य प्रधानपद दिल्यामुळे राज्यकारभारात तांत्रिक पंथाच्या लोकांचे वर्चस्व वाढले होते. असे परमानन्द काव्यात म्हटले आहे.[२]

वर वर्णन केलेल्या चरित्रापेक्षा अगदी वेगळे कविकलशाचे चित्र संभाजीराजाच्या काळातील अस्सल ऐतिहासिक कागदपत्रातून पहावयास मिळते. कविकलश हा उत्तर हिन्दुस्थानी एक कनोजी ब्राह्मण. हा हिन्दी कवी होता. शिवाजी महाराज आग्र्याहून सुटून जेव्हा महाराष्ट्रात आले त्यावेळी त्यांनी आपला मुलगा संभाजी याला बनारस येथे कबकलश नावाच्या भोसल्यांच्या कुलोपाध्यायास, काही पैसे व रत्ने देऊन स्वाधीन केले. शिवाजी महाराजांनी त्यास सांगितले की "मी सुखरूप पोहोचल्याचे तुला पत्र लिहिले की सांगितलेल्या मार्गाने त्याला परत आणावे,"[३] असे काफीखान म्हणतो. काफीखानाची माहिती ग्राह्य धरली तर संभाजीच्या बालपणापासूनच कविकलशाशी संबंध आला होता असे दिसते. यानंतर शिवाजी, संभाजी व कविकलश यांची गांठ केव्हा पडली यासंबंधी कागदपत्रे उपलब्ध नाहीत. उपलब्ध कागदपत्रावरून संभाजीराजे व कविकलश याचा संबंध राजे गादीवर आल्यानंतरच आलेला दिसतो.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी व राजाराम यांच्यात वारसा हक्कावरून झालेल्या कलहात अष्टप्रधान मंडळात दोन गट पडले. काही मंत्री सोयराबाई व राजाराम यांच्या पक्षाचे होते

---

१. श्री. य. न. केळकर यांनी भा. इ. सं. मंडळात वाचलेले एक अप्रकाशित टिपण.

२. परमानंद काव्यम् :- सं. गो. स. सरदेसाई. ३. शिवचरित्रवृत्त खंड ३.










तर काही संभाजीराजे यांच्या पक्षाचे होते. अशा परिस्थितीत महाराजांना आपल्या बाजूचा आणि आपल्या विश्वासातला कोणीतरी असावा असे वाटणे साहजिकच होते. अशा परिस्थितीतून कवि-कलशाचा राजकारणात प्रवेश झालेला असावा. अजितोदय नामक संस्कृत ग्रंथाप्रमाणे संभाजीराजे व कविकलश यांचा संबंध औरंगजेबाचा चौथा मुलगा सुलतान अकबर हा आश्रयास येण्यापूर्वी ( मे–जून १६८१ ) केव्हा तरी आला असावा. अकबर उत्तरेतून निघाला तेव्हा त्याने महाराजांना पत्र धाडले होते. अकबराला थारा देण्याविषयी राजे व कविकलश यांच्यात बोलणी झाली होती. यावरून महाराज व कविकलश यांचे महाराज गादीवर येण्यापूर्वीच जवळचे संबंध असावे असे वाटते. अकबर जेव्हा मराठी मुलुखात आल्याचे राजांना समजले तेव्हा त्यानी कलशाला सांगितले की त्याला आपल्या मुलुखात थारा देऊ नये. तेव्हा कलशाने सांगितले की दिल्लीच्या बादशहाचा पुत्र व दुर्गादास राठोड यांना आपल्या मुलुखात घेतले तर आपले नाव निघेल. कविकलशाने दिलेला सल्ला महाराजांना आवडला नसला तरी योग्य ते करण्याविषयी त्यांनी कलशास सांगितले.

१६८१ च्या ऑगस्ट–सप्टेंबर पासून संभाजीने कलशाला विश्वासात घेऊन त्याच्या सल्ल्यानुसार काही राजकीय निर्णय घेतले होते. त्यांच्या विरुद्ध झालेल्या विषप्रयोगाच्या कटानंतर संभाजी राजांनी कवी कलशाच्या बोले ( सांगण्यावरून ) मागती अण्णाजी दत्तो सचीव याजवर इतराजी करून मार दिल्हा त्या माराने राजश्री अण्णाजी पंत व बाळ प्रभु व सोमाजी दत्तो व हिरोजी फर्जन परळी खाले कैद करून मारिले.[१] असा जेधेशकावलीत उल्लेख आढळतो. जेधेशकावलीतील व उपलब्ध मराठी साधनात कलशाविषयी हाच पहिला उल्लेख आढळतो.

संभाजी राजे यांच्या कारकीर्दीत छंदोगामात्य या पदाची अष्टप्रधानात भर पडली होती. कवि-कलशाला हे पद दि. ३–८–१६८४ पूर्वी केव्हातरी दिलेले असावे. कारण त्याच पत्रात प्रथम त्याच्या नावापुढे छंदोगामात्य हे पद जोडलेले आढळते. छंदोगामात्य ह्या शब्दाबद्दल ग्रँड डफ छंदगीमात्य असे लिहितो या शब्दाचा अर्थ Expounder of Veda's असा टिपेत देतो. परंतु या दोन्हीही गोष्टी बरोबर नाहीत. शुद्ध शब्द छंदोगामात्य असा असून त्याचा अर्थ "सामवेदाध्यायी प्रधान." असा आहे. छंदोगामात्य म्हणजे सामवेदी ब्राह्मणांची व्यवस्था करणारा अधिकारी. या इसमाची दुसरी पदवी कविकलश होती असे ग्रँड डफ म्हणतो. कलश ह्या शब्दावरून तत्कालीन मराठ्यांनी कलुशा हे प्रख्यात विशेषनाम निर्माण केले. फारसी व उर्दू भाषेत कलुशा म्हणजे कुंटण असा अर्थ आहे. कविकलश या नावातील कवि ही अक्षरे गाळून कलश या शब्दाचा कलुशा असा उच्चार थट्टेखोर व मत्सरग्रस्त लोक करू लागले. विक्रमांक-देव चरित्रात बिल्हणाने आपल्या पूर्वजांची राज-कलस, जेष्ठकलस, मुक्तीकलस, अशी नावे दिलेली आहेत. त्याच धरतीचे हे कविकलश नाव असावे. ग्रँड डफ म्हणतो त्याप्रमाणे ही पदवी नाही. कवि-कलश व छंदोगामात्य या दोन्ही संबंधातील ग्रँड डफची विधाने निराधार व अज्ञानमूलक आहेत. कविकलशाला "पंडीतराई" ( पंडीतराव ) हे पद दिले होते असे ग्रँड डफ म्हणतो पण तेही निराधार आहे. कारण संभाजी महाराजांच्या कारकिर्दीच्या सुरुवातीपासून मोरेश्वर पण्डीतराय यांची १६८६ पर्यन्तची अनेक पत्रे उपलब्ध आहेत.[२] कविकलशाला जोडलेले छंदोगामात्य हे पद पुढे पेशवाईतही चालू होते. सन १७२८ मध्ये नारो प्रल्हाद याच्यापुढे छंदोगामात्य पद लावलेले आढळते.[३]

१६८१ मध्ये अष्टप्रधानांच्या नेमणुका झाल्या-नंतर काही बाबतीत कलशाकडे कामे सोपविली होती.

---

१. शिवचरित्रप्रदीप, पृ. ३१.

२. शि. च. सा. खं. २, ले. २४१, १८३५ इ. वृ. पृ. १७७. म. इ. सा. खं. ८, ले. ४०.

३. म. इ. सा. खं. २०, ले. ४७, पृ. ७२








संभाजी राजे व जयपूरचा राजा रामसिंग यांनी औरंगजेबाची सत्ता उलथून पाडण्यासाठी एक मनसुबा रचला आहे. रामसिंगला लिहिलेल्या पत्रात (१६८२) संभाजीने कलशाचा उल्लेख केला होता.[१] १६८३ च्या डिसेंबर महिन्यात कलशास 'कारभाराचे अध्यक्ष' किंवा 'कुलयेख्तीयार' म्हणून नेमलेले दिसते.[२] हा अधिकार त्याला पोर्तुगीजांशी तह करण्यासाठी दिलेला दिसतो. कलशाच्या नावाचा शिक्का दि. २२-३-१६८५ च्या पत्रात प्रथम आढळतो. तो शिक्का असा आहे.

विधिरार्थिमनीषाणामवधिर्नयवर्त्मनां
शेवधिः कार्यसिद्धीनां मुद्रा कलशहस्तगा[३]

—म्हणजेच सर्व याचक लोकांची इच्छा पूर्ण करणारी, राज्यव्यवहाराचे नियंत्रण करणारी आणि कार्यसिद्धीचा निधी असलेली अशी मुद्रा कलशाच्या हातात आहे.

दि. ३-७-१६८३ पासून कविकलशाची राज्यकारभारविषयक अनेक पत्रे मिळतात. आत्तापर्यंत उपलब्ध झालेल्या पत्रात कलशाचे पहिले पत्र दि. ३-७-१६८३ चे आहे. सोमनायक नरनायक हा सैतवडे येथे देशमुख होता. सोमाजीने सरकारी वसूलाची अफरातफर केली आहे अशी तक्रार संभाजीमहाराजांच्या कानावर घालण्यात आली. कविकलशाने या गोष्टीचा शहानिशा करून सोमाजीस लिहिले की, "तुझ्याकडे चोरीमारीचे लिगाड नाहीं कोणे गोष्टीची चिंता न करता आपले गावात येऊन राहणे :"[४]

१६८३ मध्ये फोंडागड पोर्तुगीजांच्या वेढयातून जिंकून घेण्यासाठी मराठयांच्या हवालदार, 'सरनौवत' सबनीस, नायकवडी यांनी येथे असलेल्या पिरास नवस केला होता. म्हणून कलशाने दि. २-१-१६८४ रोजी फोंडयाचा सुभेदार धर्माजी नाकनाथ यास फोंडानजीक असलेल्या पिरास नवसाची फेड करण्याविषयी लिहिले होते[५].

कविकलशाकडे कुडाळ भागाचा सुभा होता. १६८४ च्या एप्रिल मध्ये त्याचा मुक्काम पाटगावी येथे होता. ज्याप्रमाणे लोक संभाजी राजांकडे तक्रार घेऊन जात त्याचप्रमाणे कविकलशाकडे लोक आपली गाऱ्हाणी घेऊन जात. पाटगावच्या मुक्कामात पितांबर शेणवी चिटणविसाचा मुलगा जिवाजीराम चिटणीस हा कलशाला भेटला. पितांबर शेणवी यास शिवाजी महाराजांनी चिटणीसीबद्दल सालिना ४०० होनाची सनद दिलेली होती. पितांबर शेणवी मेल्यानंतर जिवाजीराव चिटणिसीचे काम करू लागला. परंतु त्याला वतन बारमाहे पाच होनाचा तह करून दिला होता. पालखी होती तीही बंद केली होती. इतक्या थोडया रकमेत भागेना व उदरनिर्वाह करणेही कठीण होते म्हणून त्याने कलशाकडे तक्रार केली. त्यावर कविकलशाने त्याला १०० होनाची सनद करून दिली. जिवाजीराम याच्याकडून चिटणिसीचे काम घेत जावे म्हणून कलशाने कुडाळच्या भानजी गोपाळ सुभेदारास यासंबंधी कळविले होते.[६]

एप्रिल १६८४ मध्ये संभाजीराजे व इंग्रज यांच्यात तह झाला होता. इंग्रजांशी झालेल्या तहाच्या बाबतीत महाराजांनी प्रल्हादपंत वकील आणि कविकलश यांना विश्वासात घेतले होते. वकील किंवा कविकलश यांनी इंग्रजांना काही लिहिले तर त्यासंबंधी नीट दखल घेण्यास महाराजांनी मुंबईचा गव्हर्नर केजविन् यास लिहिले होते.[७] या

१. House of Shivaji – Jadunath Sarkar, pp. 205-208.
२. शिवचरित्रप्रदीप, पृ. ३२-३३, ताराबाईकालीन कागदपत्रे, ले. १४३, ३६१, पृ. १९५, ५४९.
३. पेशवे दप्तर, खंड ३१, पृ. ४०.
४. मावळणकर घराण्याचा इतिहास, ले. ७, पृष्ठ १४.
५. शि. च. सा. खं. ८ ले. ४६.
६. सावंतवाडी संस्थानाचा इतिहास, ले. ३१, पृ. २७.
७. Sambhaji to Bombay ( Keijwin ). April, 1684, Sur, Vol. 109, P. 55.








तहापूर्वी प्रल्हादनिराजी न्यायाधीश व मुंबईकर यांच्यात झालेल्या पत्रव्यवहारात प्रल्हादनिराजीने इंग्रजांचा वकील, कविकलश व इतर सरकारकून यांना न भेटता गेल्याबद्दल खेद व्यक्त केला होता.[१] पोर्तुगीजांशी १६८३-८४ मध्ये झालेल्या तहात संभाजीने कलशालाच मुख्य अधिकार दिले होते.[२] अशातऱ्हेने आंबेरचा राजा रामसिंग, पोर्तुगीज, इंग्रज व संभाजी राजे यांच्यात झालेल्या राजकीय घडामोडीत कविकलश वाटाघाटी करत असे. या सर्वांशी झालेल्या राजकीय हालचालीत कविकलशाने कोठेही फितुरी केलेली दिसत नाही.

संभाजी महाराज व कविकलश हे लोकांची एकजूट करण्यासाठी आणि त्यांची मने राजी राखण्यासाठी प्रयत्न करीत असत. १६८३ मध्ये संभाजी राजांनी बकाजी नावडकर यांस कानदखोऱ्याच्या देशमुखाकडे काही मुद्यांची चर्चा करण्यासाठी पाठविले होते. देशमुखांच्या मनासारख्या काही गोष्टी न झाल्यामुळे ते नाराज झाले होते. म्हणून कलशाने छत्रपतींना विनंती करून त्यांना भेटीस बोलविले होते. ३-८-१६८४ रोजी कलशाने देशमुखाला लिहिले की, " ...... त्यावरून आम्ही रा. छत्रपतीस्वामींस विनंती करून तुम्हास भेटीस यावयाची आज्ञा केली आहे येणे मुदा मनास आणून तदनुसार पारपत्य करून देऊ. या प्रसंगी अवघे वतनदार येकमते राहोन गनिमास सजा द्यावी. आपली सरफराजी करून द्यावी." [३] हे पत्र फार महत्त्वाचे आहे. राज्यात देशमुख नाराज व असंतुष्ट झाले तर त्यांची प्रत्यक्ष संभाजी राजांशी गाठ घालून त्यांचे समाधान करण्याचा प्रयत्न कलशाने केलेला दिसतो. वतनदारांची एकजूट करून त्यांनी एकमताने वागून मोगलांचे पारिपत्य करावे म्हणून कविकलशाने प्रयत्न केले होते. वरील पत्रावरून कलशाला शत्रूच्या बंदोबस्ताचे महत्त्व कळलेले दिसते. तो स्वतः शत्रूशी फितुर दिसत नाही. उलट वतनदारांनी एकत्र येऊन मोगलाशी सामना द्यावा म्हणून त्याने प्रयत्न केलेले दिसतात.

कविकलश सर्वच बाबतीत एकटाच स्वतःच्या अधिकारात निर्णय घेत नसे. पुष्कळदा तो इतर प्रधान मंडळींच्या सल्ल्याने निर्णय घेई. महादजी जगदाळा व संताजी घाडगा यांच्या शेतातील अनेक वस्तु सितोजी व त्याचा भाऊ सटवोजी भोसले यांनी चोरल्या होत्या. सितोजी भोसले यांनी चोरले किती याविषयी साक्षी गोळा केल्यानंतर मुख्य प्रधान नीळकंठ मोरेश्वर, प्रल्हादपंत न्यायाधीश, हंबीरराव सेनापती व कविकलश यांनी एकत्र बसून निर्वाह केला होता की, जर खोट्या गोष्टी दिसून आल्या तर संभाजी राजे कोणाची गय करणार नाहीत. चोरीच्या निकालपत्रावर प्रधान, न्यायाधीश व सेनापती यांचे शिक्के आहेत. पण त्यावर कलशाचा मात्र शिक्का नाही.[४]

१६७४ पूर्वी चेऊल भागात पडिक जमिनीवर काही जादा कर घेतले जात होते. पडित जमिनीवर लादलेले कर ( खरावे) कमी करावे म्हणून चेऊलचा सुभेदार बहिरो त्रिमल यांनी शिवाजी महाराज व मोरोपंत पेशवे यांना सांगितले होते की जमिनीत उबर राहिल्या नसल्याने हरि शिवदेवला दहा-बारा वर्षे कर देता आला नव्हता. १६७४ मध्ये शिवाजी महाराज व पेशवे यांनी कर रद्द करण्याची आज्ञा दिली होती परंतु शिवाजी महाराज कोलवंडतर्फे स्वारीस गेल्यामुळे हरि शिवदेऊला सनद मिळाली नाही. अशा तऱ्हेचे खरावे इतर ठिकाणी घेतले जात नव्हते. फक्त चेऊलमध्येच घेतले जात असल्यामुळे दि. १६-८-१६८४ रोजी हरि शिवदेऊ याने कविकलशाला जादा कर रद्द करण्याविषयी विनंति केली.[५]

शहाजी महाराज व शिवाजी महाराज यांच्या वेळेपासून पुण्यातील देशमुख व देशकुलकर्णी यांना अनुक्रमे ३०५ व ९५ होनाची इनामती खंडणीची

१. Pralhad Niroji to Bombay, 16-2-1684, Sur. Vol. 109 P. 11-12.
२. पोर्तुगेज – मराठे संबंध – पां. स. पिसुर्लेकर, पृ. ११२-११३.
३. शि. च. सा. खं. ५, ले. ८७२.
४. म. इ. सा. खं. १५, ले. ११.
५. पेशवे दप्तर, खं. ३१, ले. ४३, पृ. ३८-३९.












मोइन करून दिली होती. मुलुख खराब पडल्यामुळे दस्तमाफीक इनामती खंडणी देशमुखांपासून देशमुखांची व देशकुलकर्णी यांची देशकुलकर्णी यापासून घेतली जावी म्हणून मोरो विठ्ठल देशकुलकर्णी याने अर्ज केला होता. त्यांना ज्या सवलती मिळाल्या होत्या त्या सवलती कविकलशाने दि. २२-३-१६८५ रोजी पुण्याचा बाबाजी तानदेऊ सुभेदार व कारकून यांला पत्र लिहून मोरो विठ्ठल याला सवलती देण्यास लिहिले होते.[१]

शहाजी शिवाजी यांच्या वेळेपासून वतनासाठी वतनदारात नेहमी तंटे होत असत. पुष्कळदा एकाचे वतन काढून दुसऱ्याला दिले जात असे किंवा जबरदस्तीने एखाद्याचे वतन घेतले जात असे. चिपळूण येथील एका वतनाच्या वादात कविकलशाचा संबंध आला होता. काळो परशुरामची बायको गोतमाई हिने नवरा मेल्यानंतर व विनाजी व नरसो हे पुतणे विजापुरकरांकडे नोकरीस गेले होते म्हणून चिपळूण येथील आपल्या वतनाचा कारभार पाहण्यासाठी तिमाजी भास्कर व गंगाजी भास्कर यांना नेमले. हे दोघे वतनावर हक्क सांगू लागले. त्यामुळे गोतमाईने आपल्या बहिणीचा मुलगा कृष्णाजी सोमनाथ याची वतनावर नेमणूक केली. तेवढ्यात गोतमाईचा पुतण्या विनाजी परत आला. तेव्हा त्याने तिमाजी व गंगाजी भास्कर यांना दूर करून कृष्णाजी सोमनाथ याच्या नावाने वतन करून दिले. गोतमाईला मुलगा नव्हता. तिने कृष्णाजी पंताचा एक मुलगा दत्तक घेण्याचे ठरविले. तिच्या सांगण्यावरून कृष्णाजीचा मुलगा जनार्दन याला विनाजीच्या मांडीवर दत्तक देण्यात आले. तेवढ्यात विनाजीला मुलगा झाला. काही दिवसांनी विनाजीने कृष्णाजीपंतास लिहून दिले की त्याच्या दोन मुलांनी व कृष्णाजीचा मुलगा हरीने एकदिलाने वंशपरंपरेने वतनाचा उपभोग घ्यावा.

संभाजीमहाराजांच्या कारकीर्दीत या वतनासंबंधी वाद निर्माण झाला. अण्णाजी दत्तोने संगमेश्वरच्या देशकुलकर्णीस कोणी खावंद नाही म्हणून महाराजाकडून संगमेश्वरचे देशकुलकर्णीचे वतन करून घेतले. हे कळताच राहूजी सोमनाथानेही अण्णाजी दत्तोच्या शिवेशेजारी वतनाची मागणी केली. त्यासुमारास तिमाजी भास्करचा पुतण्या (ज्याला गोतमाईने दूर केले होते) रायगडास होता. त्याने राहूजीस व अण्णाजी पंतास सांगितले की, चिपळूणच्या देशकुलकर्ण्याचे वतनावर कोणी नाही. तिमाजीने चिपळूणच्या देशकुलकर्णवतन राहूजी सोमनाथाच्या नावाने करून दिले. ही गोष्ट कृष्णाजी पंताला कळली म्हणून तो फडास जाऊन या वतनाकरिता त्याने ६ महिने वाद घातला. सरकारकुनांपुढे कृष्णाजी व राहूजी यांच्या वादाचा निकाल लागला नाही. एका प्रसंगी कविकलश संगमेश्वराहून परशुरामाला गेला होता. राहूजी सोमनाथ चिपळूणला गेला. कलश परशुराम येथे भोजनास थांबला असता कृष्णाजीने विनाजी व त्याचे दोन पुत्र यांना कलशाच्या पायावर घालून जुलूम होत आहे दाद मिळावी म्हणून अर्ज केला. तेव्हा कलशाने कारभारी कोनेरपंत यास रागानेच विचारले की, "हे प्रकरण माझ्यापर्यंत का आले तुम्हीच याचा निकाल लावावयास हवा." त्यावर कोनेरपंताने कृष्णाजीस निवाडा करून देतो म्हणून सांगितले.

कोनेरपंत व कृष्णाजी रायगडला गेले. तेथे कोनेरपंताने कृष्णाजीच्या तोंडून सर्व हकिकत ऐकून घेतली. सहज एकदा कविकलश भोजनास बसला होता. त्यावेळी पंडितानी येऊन न्यायनीतीच्या शास्त्राची चर्चा केली. त्यामध्ये एकाची वृत्ती छेद करून दुसऱ्यास देणे या पापाला जोड नाही अशी वाक्ये उच्चारली गेली. ही संधि साधून कोनेरपंताने कलशास सांगितले की, कृष्णाजीचे वतन खरे आहे. निष्कारण त्याच्यावर अन्याय होत आहे. शास्त्राच्या बोलण्यात व त्याच्या सांगण्यात एकवाक्यता झाल्यावरून कलशाचे मन द्रवले. त्याने निश्चय केला की राहूजीपंताचे वतन दूर करून कृष्णाजीचे वतन त्याचे त्यास द्यावे. तेवढ्यात राहूजीपंताने त्वरा करून चिपळूणास जाऊन महजर करून लोकांस तश्रीफा द्यावयाची ताकीद केली. कृष्णाजीने विनाजीला सांगितले की जेथे सभागण

१. पेशवे दप्तर, खं. ३१, ले. ४५, पृ. ३९–४०.








जमले असतील तेथे जाऊन जुलुम होतो म्हणून बोंब मार. सुरवातीला अपशकून नको म्हणून राहूजीचे लोक आपापल्या घरी गेले. राहूजीपंत एवढेसे तोंड करून परशुरामास गेला तेथे कलशाची भेट झाली. तेव्हा कलश राहूजीला म्हणतो, " तुम बुढे होकर राज्याजीका निशा कर कर गरीब बमणका वतन लेकर तुम लेते हो ये मनसुफी हम जानता नहीं। राज्याजीने दिया तुम राज्या देखकर लेवा।" म्हणून निःश्रीसून सांगितले. नंतर कलश निघून गेला. राहूजीपंत डोलीत बसून निघाला असता वाटेत कृष्णाजीपंताने आपली डोली उभी केली व त्यास म्हणाला की, " राहुजीनाना तु म्हातारा जाला आहेस. उद्या मरोन जासील, तुजपासी पटकुल अपरांपर असता तुझ्या पुत्रास काय उणे आहे ? हे टाकून माझ्या आंगावरील घोंगडी जुनी बलात्कारी हिरोन घेतोस."

कृष्णाजीपंताने वतनाचा मामला सोडला नाही. त्याने रायगडास जाऊन भगवे कपडे घालून उपोषण आरंभिले. संभाजीराजे रोज बाहेर येताच त्यांना मुजरा करू लागला. महाराज एकदा गांगोलीस गेले. तेथेही कृष्णाजी गेला. डोहात होडचा टाकून राजे तेथे गेले, तेव्हा तेथे कृष्णाजीपंत उभा राहिला व त्याने महाराजांना हाका मारल्या, " साहेब, सर्वज्ञ, शास्त्रार्थचा अर्थ स्वता पंडिताचा निशा होय, ऐसा करिताती असे असोन माझे पारिपत्य होत नाही." महाराजांनी कृष्णाजीपंतांची कहाणी ऐकून घेतल्यानंतर त्यांनी न्यायाधीश प्रल्हादपंतास योग्य तो न्यायनिवाडा करण्यास सांगितले. प्रल्हादपंतानी सांगितले की, " थोरले महाराज होते ते थोराची भीड पडली तऱ्ही एकाचे वतन काढून दुसऱ्यास सहसा दिल्हे नाही. आणि साहेब महाराज पुत्र भीडेमारने या ब्राह्मणचे खरेखुरे असता बलात्कारे काढून दिले." त्यावर महाराजांनी राहूजीपंताचे कुलकर्ण दूर करून कृष्णाजीपंतास करार करून राजश्री प्रल्हादपंती राजपत्र व आपले पत्र दाभोळचे सुभेदार वेकाजी निमदेव ह्यास दिले. कृष्णाजीपंत वतन उपभोगू लागला. वतनाच्या करीन्यात संभाजीच्या काळातील रघुनाथ नारायण पंडित, प्रल्हाद पंडित, रामचंद्र पंडित, शंकराजी पंडित, परशुराम पंडित, कोनेरपंत व कवजीबाबा अशी नांवे आहेत.[१]

या वतनाचा वाद राजारामाच्या कारकिर्दीत पुन्हा उद्भवला. राहूजी सोमनाथ व कृष्णाजी सोमनाथ मरण पावले होते. कृष्णाजीपंतांचा मुलगा हरि राजारामास भेटला. वतनाच्या कागदात हरीचे नांव नव्हते. परंतु त्याने आपल्या पुत्रांनी व हरिपंतांनी मिळून वतनाचा उपभोग घेण्याविषयी विनाजीचे पत्र दाखविले. पत्रात हरिपंतांचे नांव घातले. राजारामाच्या कारकिर्दीत पैशाची अडचण निर्माण झाली होती. हरिपंतांच्या नांवे दोनशे रु. येणे होते. तेवढयात राहूजीपंतांच्या मुलांनी राजारामास सांगितले की चिपळूणचे कुलकर्णाचे वतन संभाजी राजांनी दिले आहे. त्यावर राजाराम बोलले की, " दाजीने एकाचे वतन काढून दुसऱ्यास काय समजोन दिल्हे ? " त्यांनी राहूजीपंतांच्या मुलांच्या नांवे वतन करून दिले.[२] अशा तऱ्हेने संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत कृष्णाजीवर झालेला अन्याय दूर होऊन त्याचे वतन त्यास मिळाले होते. गोतमाईच्या हकिकतीवरून कृष्णाजीच्या मुलांचाच वतनावर अधिकार होता, परंतु राजारामाच्या कानावर राहूजी सोमनाथाच्या मुलांनी अर्धवट मजकूर घालून आपल्या नावाने पुन्हा वतन करून घेतले.

कविकलश राज्यकारभारातच लक्ष देत होता असे नाही; वेळप्रसंगी तो इतर सरकारकुनांप्रमाणे युद्धाच्या आघाडीवरही जात असे. १६८५ सालापर्यंत संभाजी महाराजांचे अनेक ध्येयनिष्ठ सेवक धारातीर्थी पडले होते. अनेक आघाडयांवर मराठ्यांना मोगलांबरोबर मुकावला करावा लागत होता. दि. १४-१-१६८५ च्या सुमारास मोगली अधिकारी शाबदीखान रायगडावर चढाई करण्यासाठी पुण्याहून दौड करून बोरघाट उतरून गांगोलीस गेला.

१. भा. इ. सं. मं. द्वितीय संमेलन वृत्त. १८३६ पृ. ५२ ते ६७.

२. पेशवे दप्तर, खं. ३१, ले. ७९, पृ. ७०–७१.










त्यावेळी कविकलशाने त्याच्याशी सामना देऊन त्याला परतविले होते.[१] अशा तऱ्हेने आलेल्या संकटाला इतर सरदारांबरोबर कलशानेही तोंड दिले होते.

एकीकडे संभाजी राजे व त्यांचे अनुयायी स्वराज्याचे संरक्षण करीत होते तर दुसरीकडे महाराज मोगलांच्या आक्रमणाविरुद्ध विजापूरकर व गोवळकोंडेकर यांच्या मदतीस धावून जात होते. १६८५च्या जून-जुलै मध्ये संभाजी राजांनी कविकलशास विजापूरकरांना मदत देण्यास सांगितले तेव्हा कलशाने पन्हाळयास जाऊन तेथून विजापूरकरांच्या मदतीस फौजा रवाना केल्या.[२]

सुलतान अकबरला गोव्याच्या हद्दीतून परत आणल्यानंतर संभाजी राजांनी त्याचा उपयोग पोर्तुगिजांबरोबर झालेल्या तहात मध्यस्त म्हणून करून घेतला. त्यानंतर अकबर साखरपा, राजापूर या परिसरात वावरत होता. येथून तो संभाजी राजे व कविकलश यांच्याशी पत्रव्यवहार करीत राहिला. दि. २७-७-१६८४ ते डिसेंबर १६८४ पर्यन्त अकबराने कविकलशाला पांच पत्रे लिहिली.[३] या पत्रव्यवहाराची सविस्तर माहिती अकबर प्रकरणात दिलेली आहेत. १६८४च्या ऑगष्ट मध्ये कविकलश आजारी होता. त्याच्या आजारपणासंबंधी अकबरने आपल्या पत्रात उल्लेख केलेला आहे.[४] कविकलश आजारी असल्यामुळे गोवेकरांनी त्यास फिरंगी औषधे पाठविलीं होती.[५] पोर्तुगिजांबरोबर झालेल्या तहात कविकलश व निळो मोरेश्वर प्रधान यांच्यात मतभेद झाले होते.[६]

१६८६ मध्ये औरंगजेबाने विजापूर व गोवळकोंडा ही राज्ये हस्तगत केली. त्यावेळी मराठयांच्या सरहद्दीवरील देसायांची मनःस्थिती विचलित झाली होती. औरंगजेबाने अनेक सरदारांना जहागिऱ्या देऊन त्यांना आपल्या पक्षात ओढण्याचा प्रयत्न केला होता. या देसायांपैकी काहींना दिलासा देऊन स्वराज्याशी एकनिष्ठ राहण्याविषयी संभाजी महाराज व कविकलश प्रयत्न करीत होते. दि. २४-११-१६८६ रोजी मोघेगौडा देसायाला कलशाने पत्र लिहून त्याची मैत्री व एकनिष्ठता संपादण्यासाठी प्रयत्न केले होते.[७] कलश स्वतः शत्रूला फितूर झालेला नव्हता. उलट देसायांनाच मराठयांच्या बाजूने लढण्याविषयी त्याने प्रयत्न केलेले दिसतात.

कवि कलशाला मुख्य प्रधान किंवा न्यायाधिशाचे पद दिलेले नव्हते. शिवाजी महाराजांच्या काळातील मोरोपंत पेशवे यांचा मुलगा निळो मोरेश्वर हा मुख्य प्रधान असून प्रल्हाद निराजी न्यायाधीश होता.[८] पंतप्रधानाने किंवा न्यायाधिशाने दिलेल्या हुकुमाची अंमलबजावणी कविकलश आपल्या प्रांतातील अधिकाऱ्याकडून करवून घेत असे. राजापूर प्रांतातील रागदे प्रभु व चांद प्रभु, देशमुख यांचे वारसदार गोविंद प्रभु याच्याकडे देशमुखीच्या वृत्तीसंबंधी पहिल्या तक्षीमा ठरल्या होत्या. तरी तो उगाच भांडण काढून जास्त हक्क तक्षीमा मागत होता म्हणून निळो मोरेश्वरने महाराजांच्या आज्ञेनुसार दि. १०–५–१६८५ रोजी राजापूरचा देशाधिकारी देवाजी विठ्ठल यांस लिहून कळविले होते की, "गोविंद प्रभु कथला करून जाजती हक्क तक्षीम मागतो म्हणून हुजूर कळो आले त्यावरून तुम्हास आज्ञापत्र सादर आसे याच्या तक्षिमा पहिल्या जाहाल्या असता जो कथला करील त्याला ताकीद करून हालखुद ठेवणे ज्याजस्ती करू न देणे."[९] वरील निर्णयाप्रमाणेच कविकलशानेही दि. २५–६–१६८५ रोजी राजापूरचा देशाधिकारी गंगाजी बाबाजी याला कळवून अंमलबजावणी करण्यास सांगितले होते.[१०]

---

१, २. शिवचरित्रप्रदीप पृ, ३३.

३, ४. मोगल–मराठा संघर्ष– सेतु माधवराव पगडी, पृ. ६५–६७.

५, ६. पोर्तुगेज– मराठे संबंध– पां. स. पिसुर्लेकर, पृ. ३२७, ११५.

७. शि. च. सा. खं. १२, ले. २, पृ. ५

८. शिवचरित्रप्रदीप, पृ. ३०.

९, १०. ऐ. सं. सा. खं. ११, ले. १.२पृ. १.








एका शुद्धी प्रकरणात कविकलशाचा संबंध आला होता. १६८०–८१ मध्ये औरंगाबाद प्रांतातील कसबे हरसूल येथील गंगाधर रंगनाथ कुलकर्णी हा ब्राह्मण मोगलांकडे नोकरीस होता. औरंगजेबाने त्याला बळजबरीने बाटविले होते. तीन महिने त्याला कैदेत ठेवले. नंतर त्यास मनसब देऊन पुन्हा चाकरीस ठेवले. त्याने पाच वर्षे मोगलाच्याकडे नोकरी केली. परंतु त्या ब्राह्मणाला स्नानसंध्यादिक कर्मे करता आली नाहीत. पाच वर्षात त्याने अन्नोदकसंसर्ग केला नाही. १६८५ मध्ये तो रायगडला आला. दरबारात जाऊन महाराज सरकारकून, न्यायाधीश, उपाध्ये, दानाध्यक्ष व भलेभले ब्राह्मण यांच्याशी शरण येऊन प्रायश्चित्त मागत होता. हे वर्तमान छंदोगामात्यास विदित झाले. या ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बघून कलशाने संभाजी राजांना वृत्तान्त विदित केला. त्यानंतर छत्रपतींनी प्रायश्चित्त देण्याची आज्ञा दिली. उपाध्ये, मोरेश्वर पण्डीतराय, यांनी छंदोगामात्याचे सभेत विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमत्तीने मिताक्षरादि निबंध पाहून प्रायश्चित्त संकल्प सांगितला. त्या ब्राह्मणास त्रिंबकेश्वरास पाठविले. श्री त्रिंबकेश्वर व श्रीगिरी प्रदक्षिणा झाल्यानंतर त्याला पूर्वीच्या गंगाधर या नावाने शुद्ध करून घेतले. श्रीक्षेत्रीची पत्रे आल्यानंतर प्रायश्चित्त विधी पार पडला. हा सगळा वृत्तान्त कविकलशाला सांगण्यात आला. त्यानेही कारकून, न्यायाधीश यांच्या अनुमताने आपल्या पंक्तीस भोजन देऊन शुद्धीपत्र देण्यास आज्ञा केली. जो कोणी याच्या ब्राह्मण्याविषयी संदेह मानील तो देवब्राह्मणद्वेषी, महापातकी जाणीजे. असे मोरेश्वर पंडीतराय याने दि. १६-३-१६८६ औरंगाबादच्या उपाध्ये, वेदमूर्ति व महाराष्ट्रातील कोकण-देशस्थ वैदिक गृहस्थांना कळविले. या शुद्धी पत्रावर मोरेश्वर पंडितराय दानाध्यक्ष, राजश्री नारो रघुनाथ आमात्य, कविराज महेसदास, समंत केशव पंडितस्य सोमनाथभट दशग्रंथी, संगमेश्वरकर, राजश्री केसो त्रिमळ पिंगळे, हरजी राजे महाडिक, गंगाधर मोरेश्वर प्रधान, राजश्री प्रल्हाद निराजी न्यायाधीश, रघुनाथ कोर्डे व इतर अनेकांच्या व कविकलश यांच्या सह्या आहेत.[१] वरील पत्रात कविकलशाला समस्त राजकार्यधुरंधर वर्णाश्रमधर्मप्रतिपालक छंदोगामात्य असे म्हटले आहे. बाटविलेल्या हिंदूंना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेण्याचे शिवाजी महाराजांचे धोरण संभाजी राजे व कविकलश याने चालू ठेवले होते.

१६८८ च्या जानेवारी महिन्याच्या पूर्वी देवरुख येथील त्रिमाजी नाा, कान्होबा नाा, देशमुख व रामाजी गोविंद यांच्यात देशमुखीच्या व्यवहाराबद्दल भांडण चालू होते तेव्हा ते दोघे प्रल्हाद निराजीकडे गेले. संभाजी राजांनी असे ठरविले होते की ज्याचे वृत्तीस ३०–३५ वर्षे भोगवटा चालला असेल तोच खरा देशमुख या निर्णयाला कविकलशाने संमती दिली होती. प्रल्हाद निराजीने महाराजांच्या निर्णयानुसार दि. ६-१-१६८८ रोजी राजापूरच्या गंगाजी दादाजी सुभेदारास कळविले होते की, "तिमाजीच खरा रामाजी गोविंद कथला करतो, त्यास कथला करावयास संबंध नाही."[२] प्रल्हादपंतांच्या निर्णयानुसार कविकलशाने दि. ८-१-१६८८ रोजी राजापूरच्या अधिकाऱ्यास वरील हुकुमांची अंमलबजावणी करण्यास सांगितली होती.[३]

१६८८ मध्ये कविकलशाचा मुक्काम पन्हाळा मलकापूरच्या परिसरात होता. त्याचा मुक्काम रायगडवर दिसत नाही. त्यानेच तुळशीच्या प्रकरणात व मोंगलांच्या स्वाधीन करून देण्यास महाराजांना रायगडवरून बाहेर काढून संगमेश्वरला नेले या नाटकातील समजुतीला आधार मिळत नाही. उलट तो मलकापूर, राजापूर भागातील राज्यकारभाराची चोख अंमलबजावणी करताना दिसतो. कोणत्याही तऱ्हेने राज्याचे नुकसान होऊ नये म्हणून दक्षता घेताना दिसतो.

तुळाजी देसाई हा शिराळे येथील देशमुख होता. १६८२ मध्ये सोमाजी बांदल याने बळेच बिलासीतरफेचे बारा गांव वारणेचे देशमुखीकडे कमाविशीस लावले. याबाबत तुळाजी देसायाने

---

१. म. इ. सा. खं. ८, ले. ४०.

२, ३. म. इ. सा. खं. २१. ले. ४५, ४६.










महाराजांच्या कानावर घालताच त्यानी वारणेची बारा गावे तुलाजी देसायाच्या शिराळचा गावाकडे लावून दिली.[1] या वारणाकडील बारा गावापैकी काही येणे हुजूरदप्तरी बाकी होती. याबद्दल कविकलश त्यास दि. २७-५-१६८८ रोजी लिहितो. "वारणा कदेत पैकी हुजुरदप्तरी बाकी ओढत आहे. त्यापैकी बद्दल देणे ऐवज दाणा पागा सरसुभा राजश्री सेनापती गला केली नवसरी सोळुले माप खंडी दाहा रास देविले असत खुद निसबापैकी आदा करून पावलियाचा कागद घेणे जाणिजे छ ७ शाबान मलकापुरी पागा मारनिलेकडील छावणीस आहे तेथे देणे. पावलियाचा कागद खुद मारचा घेणे."[2] या पत्राच्या सुरुवातीला आज्ञाधारक धर्माभिमान कर्मकांड परायण दैवतीनिस्टग्राहिताभिमान सत्यसंध समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री कविकलश छंदोगामात्य असे लिहिले आहे. त्याचप्रमाणे तुळाजी देसायाकडे सरदेशमुखीचे बाबतीत कर्ज देणे होते. गला खंडी २० पैकीबद्दल मिराबाखान दिलेरखानाचा भाऊ कविकलशाकडे होता त्याला तकदीम होन पा ४० जाळीस रास देविले होते. पावल्याचा कागद घेण्याविषयी कविकलशाने त्यास दि. ८-९-१६८८ रोजी लिहिले होते[3] वर लिहिल्या पत्रानंतर लगेच दोनच महिन्यांनी म्हणजे १६८८ च्या आक्टोबर-नोव्हेंबर मध्ये संभाजी राजांचे मेव्हणे शिर्के व कविकलश याच्यात काही कारणावरून बेबनाव झाला. शिर्के कलशावर रागावले होते. याचे कारण मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरीत खालीलप्रमाणे दिले आहे. "शिर्के यांनी विचार केला की या कलशाने राज्यांस बुडविले यांस नेऊन मारावे. म्हणोन पंचविस हजार इसम मिळविले हे वर्तमान कब्जीकडील कारभारी यानी कबजीस श्रुत केले. त्याने महाराजास लिहून शिर्के याजवर हल्ला करून लोक बहुत मारिले."[4]

'ईश्वरदास नागरने आपल्या फुतूहाने अलमगिरी यात कविकलशाच्या फितुरीसंबंधी वर्णन केले आहे "कविकलश हा संभाजीचा मंत्री होता. राज्यव्यवस्था उत्तम ठेवणे आणि किल्ल्यांची निगा राखणे इ. कामे तो झटून करत असल्यामुळे संभाजीची त्याच्यावर कमालीची मर्जी बसली होती. संभाजीच्या कारभाऱ्यांपैकी कांहींना कवि कलशाच्या उत्कर्षासंबंधी मत्सर वाटला. त्याला त्याच्या हुद्द्यावरून खाली आणावे आणि त्याच्या जागी दुसऱ्याची स्थापना करावी असे त्यांनी ठरविले. या उद्देशाने ते रात्रंदिवस त्याच्या मागे लागले. त्याच्या चांगल्या कामाचाही विपर्यास करून त्यांनी त्याला बदनाम केले. शेवटी त्यांनी त्याला हुद्द्यावरून खाली ओढले. कवि कलश हा फजीत पावून खेळण्याच्या किल्ल्यांत जाऊन बसला.

कविकलशाचे खेळण्याच्या आश्रयाने जाऊन बसणेंही त्याच्या विरोधकांना आवडले नाही. त्याचा सर्व नाश करावा म्हणून ते झटू लागले. खेळण्याचा किल्ल्यातही आपल्याला सुरक्षितता नाही असे कवि कलशाला वाटू लागले. संभाजीचे काही सरदार संभाजीवर चिडले होते. कविकलश आणि वरील सरदार सेवेत हजर झाले. बादशहाकडून त्यांचा योग्य तो मानसन्मान करण्यात येऊन त्यांना मन्सबी देण्यात आल्या ...... कविकलश आणि त्याच्या बरोबर गेलेले सरदार यांचे बादशहापाशी अर्जित होत असलेले पाहून संभाजीचे इतर सरदारही बादशहाच्या सेवेत हजर होऊन त्याची चाकरी करू लागले."[5] यानंतर संभाजी राजांनी कविकलशास पत्र लिहून आपल्याकडे बोलावून घेतले. नंतर कविकलश संभाजीकडे येऊन, त्याने फितुरी करून राजांना मोंगलांच्या हाती पकडून देण्याचे कारस्थान केले. असे ईश्वरदास नागरे लिहितो.

औरंगजेबाला सरळ मार्गाने संभाजी महाराजाविरुद्ध लढून यश मिळेना. कट, कारस्थाने करून,

१. शि. च. सा. खं. ६, ले. १११.

२, ३. शि. च. सा. खं ३. ले. ६४४, ६४५.

४. मराठी साम्राज्याची छोटी बखर, पृ. ६१-६३.

५. मोगल- मराठा संघर्ष- सेतुमाधवराव पगडी. पृ. २८-२९.










फितुरीने महाराजांना पकडण्यासाठी औरंगजेबाने कविकलशाला पत्र लिहिली. नजराणे व पैसा दिल्याने कलशाने संभाजीला पकडून देण्याचे बादशहाला कबूल केले.[१] असे इटालियन प्रवासी मानुत्ची याने लिहिले आहे. मानुत्ची ईश्वरदास नागर व रॉबर्ट ऑर्म यांनी कलश फितुर झाला असे म्हटले आहे. परंतु इतर फारसी व मराठी साधनात फितुरीचा पुरावा मिळत नाही.

मराठी साम्राज्याच्या छोटया बखरीवरून व ईश्वरदास नागरच्या माहितीवरून कलशाला त्याच्या हुद्यावरून काढून टाकण्यासाठी कारभाऱ्यांनी प्रयत्न केले होते. १६८८ च्या सप्टेंबर महिन्यापर्यंत कलश मलकापूरला होता. यानंतर दोनच महिन्यांनी म्हणजे ऑक्टोबर–नोहेंबर १६८८ च्या सुमारास संभाजी महाराजांचे मेहुणे शिर्के व कवि कलश यांच्यात काही कारणावरून बेबनाव झाला. कलशावर शिर्के पारखे झाल्यामुळे तो पळोन खेळणा गडावर गेला. त्याच महिन्यात संभाजी राजे रायगडावरून कलशाच्या मदतीस गेले. त्यांनी शिर्के यांच्याबरोबर युद्ध करून त्यांना पळवून लावले. नंतर महाराज खेळण्याला गेले.[२] या प्रसंगानंतर एकच महिन्याने म्हणजे नोहेंबर-डिसेंबर १६८८ च्या सुमारास संभाजी राजांनी कलशाचे बोले ( सांगण्यावरून ) प्रल्हादपंत व सरकारकून व कित्येक लोकांस धरले. शिर्के यांना ज्या ज्या लोकांनी मदत केली त्यांना कैद करण्यात आले होते[३] असे दिसते. विठ्ठल नारायण याची मौजे पाडली तर्फ देवळे येथे खोती होती. तो शिर्क्यांना मिळाला म्हणून कलशाने त्याची खोती काढून त्यास खेळण्यास अटकेत ठेवले होते. त्याची खोती खेळणागडाच्या हवालदार कृष्णाजी कोंडा यास दिली. पुढे चार–पाच महिन्यांनी राजारामान त्यास मुक्त करून त्याची खोती त्यास परत दिली.[४] प्रल्हादपंतासारख्या न्यायाधीशासकट इतर सरकारकुनाची ज्या अर्थी धरपकड झाली होती त्या अर्थी कलशाचे शिर्के यांच्या बरोबरचे भांडण साधेसुधे नसावे.

संभाजी राजे व कविकलश यानी खेळणा गडाची दुरुस्ती केली तेथील बंदोबस्ताची व्यवस्था करून ते रायगडला जाण्यास निघाले. प्रथम ते पन्हाळचास गेले.[५] परंतु पन्हाळचाभोवती मोगली सैन्य असल्याने त्यानी संगमेश्वरला जाऊन तेथून रायगडला जाण्याचे ठरविले. संगमेश्वराच्या मुक्कामातच महाराज व कविकलश मोंगलांच्या हाती सांपडले. संभाजीराजाबरोबर कलशाचाही छळ करण्यात येऊन त्याला मारण्यात आले.[६] त्याचा सविस्तर वृत्तांत 'दुर्दैवी संभाजी' या प्रकरणात दिलेला आहे. पुण–नगर रस्त्यावर कोरेगाव जवळ वढू येथे संभाजी महाराजांचे वृंदावन आहे. तेथेच कलशाचे वृंदावन आहे.

मोगल सरदार सय्यद अब्दुल्लाखान हा रायगडला वेढा घालण्याच्या विचारात होता. बादशहाने आज्ञा केली की संभाजी राजांचा मेव्हणा महादजी याने रायगड किल्लचाची मेणाची प्रतिकृति तयार करावी. या कामांत कविकलशाचा मुलगा याने महादजीला मदत करावी.[७] असे ईश्वरदास नागरने नमूद केले आहे.

राजारामाच्या काळात कविकलशाच्या बायकोचे व मुलांचे खूप हाल झाले. शेवटी कंटाळून ही मंडळी मारवाडात निघून गेली. अशा तऱ्हेने संभाजीशी आठ– नऊ वर्षे एकनिष्ठ राहिलेल्या कलशाचा व त्याच्या कुटुंबियाचा शेवट झाला.

---

१. Storia do Mogor. Niccolao Manucci, Vol. II. p. 310
२, ३. शिवचरित्रप्रदीप. पृ. ३४.
४. ताराबाईकालीन कागदपत्रे, ले. ३२. पृ. ५३.
५. इ. ऐति. शिवकालीन घराणी, भाग. ५. ले. ३७०, पृ. १००, १०५.
६. शिवचरित्रप्रदीप– पृ. ३४, ३५.
७. मोगल– मराठा संघर्ष– सेतुमाधवराव पगडी, पृ. २६, २७.



अनुक्रमणिका






डॉ. रा. भा. पाटणकर

# कांटची कलाविषयक उपपत्ती– ३

५१. या व पुढील काही परिच्छेदात कांटने ललित कलांचे वर्गीकरण केले आहे व ज्या तत्वानुसार हे वर्गीकरण केले आहे त्याची चर्चाही केली आहे. या परिच्छेदाच्या सुरुवातीसच जे वाक्य आहे, त्यामुळे वाचकांच्या मनात एक शंका उत्पन्न होणे स्वाभाविक आहे. म्हणून त्या वाक्याचे स्पष्टीकरण करणे जरूर आहे ते वाक्य असे :– Beauty (whether it be of nature or of art) may in general be termed the *expression* of aesthetic ideas. सौंदर्य म्हणजे aesthetic ideas चा आविष्कार असे कांट येथे सांगत आहे. पहिल्या चार उल्लासात कांटने सौंदर्याविषयी जे सांगितले त्यात व वरील वाक्यात मेळ कसा घालावयाचा? पहिल्या चार उल्लासात कांटने रचनावादी भूमिका घेतलेली आहे हे आपण पाहिलेच आहे. विशेषतः स्वायत्त सौंदर्याविषयी लिहिताना त्याने रचनावादावद्दल आग्रह धरला आहे. ( पहा परिच्छेद १६ ) पुन्हा स्वायत्त सौंदर्याचे नमुने केवळ निसर्गातच आढळतात असे नसून ते कलाकृतींमध्येही दिसतात असे म्हणून त्यांची काही उदाहरणेही दिलेली आहेत. त्याचप्रमाणे परिच्छेद १४ मध्ये In painting, sculpture, and in fact in all the formative arts, in architecture and horticulture so far as fine arts, the *design* is what is essential असेही स्वच्छ म्हटले आहे. यावरून स्वायत्त सौंदर्याच्या क्षेत्रात कांटची भूमिका रचनावादी आहे हे स्पष्ट होते. अवलंबित सौंदर्याच्या बाबतीत गोष्ट निराळी आहे. तेथे संकल्पनांचा वापर झालेला असल्याने केवळ रचनेला महत्त्व नसते. तीच गोष्ट Ideal of beauty बाबतही खरी आहे. अवलंबित सौंदर्य व Ideal of beauty यांचे स्पष्टीकरण देताना कांट आविष्कारवादी झाल्याचे दिसते. परंतु त्यावरून इतकेच सिद्ध होते की सौंदर्याचे दोन प्रकार असतात व त्यात दोन वेगळी तत्त्वे दिसतात असे कांट मानीत होता. पण ज्या वाक्याची आपण आता चर्चा करीत आहोत त्यावरून असे दिसते की कांटची भूमिका पुन्हा एकदा बदलली आहे. येथे तो पूर्णपणे आविष्कारवादी झाल्याचे दिसते. या भूमिकांतरामागील कारणे शोधणे जरूर आहे. कांटला सौंदर्यमूल्य परभृत नसून स्वयंभू आहे असा सिद्धांत मांडायचा होता. त्यासाठी दोन गोष्टी करणे जरूर होते. सौंदर्यानुभवातली आपली भूमिका ज्ञानात्मक किंवा नैतिक नसते; ती तटस्थ अवलोकनाची असतें असे दाखविणे जरूर होते. पण तटस्थ अवलोकनाची भूमिका कोणत्याही गोष्टीच्या बाबतीत धारण करता येत नाही. जर एखाद्या गोष्टीची रचना ज्ञानात्मक किंवा नैतिक तत्वानुसार झालेली असेल तर तिच्या बाबतीत तटस्थ अवलोकनाची भूमिका धारण करणे शक्य नसते. म्हणून तटस्थ अवलोकनाबरोबर जिचे अवलोकन करायचे तिची अंतर्गत रचना विशिष्ट प्रकारची (म्हणजे ज्ञानात्मक व नैतिक तत्वानुसार न झालेली अशी ) असायला हवी असे म्हणणे क्रमप्राप्त ठरले. तटस्थ अवलोकन व जिचे अवलोकन करायचे त्या गोष्टीची विशिष्ट रचना या दोन संकल्पना परस्परावलंबी व परस्पर पूरक आहेत. जर सौंदर्यमूल्य स्वयंभू आहे असे म्हणायचे असेल तर वरील दोन गोष्टी म्हणणे अपरिहार्य ठरते. पण कांटला इतकेच म्हणायचे नव्हते, त्याला सौंदर्यानुभव हा ज्ञानानुभव व नैतिक अनुभव यांच्यापेक्षा वेगळा आहे हे जसे सिद्ध करायचे होते तसेच सौंदर्यानुभवात व या दोन अनुभवांत काही बाबतीत साम्य आहे असेही सिद्ध करायचे होते. सौंदर्याचे विश्व हे ज्ञान व नीती यांच्यातील दुवा आहे असे कांट मानीत होता व म्हणून या तीन प्रकारच्या अनुभवांमध्ये काही बाबतीत साम्य आहे असे त्याने म्हणणे क्रमप्राप्तच होते. स्वायत्त सौंदर्याचा सिद्धांत मांडताना कांटच्या मनात या तीन अनुभवातील भिन्नता प्रामुख्याने होती. पण अवलंबित सौंदर्याचा व Ideal of beauty चा सिद्धांत मांडताना








या अनुभवांतील सारखेपणाकडे त्याने विशेष लक्ष पुरविल्यासारखे वाटते. वरील विवेचनावरून असे ध्यानात येईल की स्वायत्त सौंदर्याविषयीची कांटची भूमिका रचनावादी आहे; व अवलंबित सौंदर्याविषयीची त्याची भूमिका आविष्कारवादी आहे. पण या लेखाच्या सुरुवातीला जें वाक्य दिले आहे. त्यावरून तो केवळ आविष्कारवादी झाल्यासारखे वाटते याचे एक कारण वर सूचित झालेलेच आहे; ते असे– त्याने आपल्या एकूण तत्वज्ञानात सौंदर्यानुभवाला जे स्थान दिले होते त्यावरून तो आविष्कारवादाकडे झुकणे स्वाभाविक होते. दुसरे कारण असे की ज्याला वाङमयादि कलांमध्ये विशेष रस आहे त्याचा स्वाभाविक कल आविष्कारवादाकडे असतो. कांटला एकूण कलांमध्ये फारसा रस नव्हता हे आपण बघितले आहे. पण त्यातल्या त्यात वाङमयात त्याला सर्वात ज्यास्त रस असावा असे वाटते. हे सर्व जरी खरे असले तरी आपण रचनावादाकडून आविष्कारवादाकडे कसे व का आलो याचे कांटने स्पष्टीकरण देणे जरुर होते असे आपल्याला वाटत राहते.

सौंदर्य म्हणजे विचारादिकांचा (– संकल्पनांचा नव्हे –) आविष्कार आहे असे सांगून कलासौंदर्य व निसर्गसौंदर्य यांच्यातील भेद कांटने स्पष्ट केला आहे. आविष्कार जिच्यात व्हायचा अशी वस्तु (म्हणजे कलाकृती) जाणीवपूर्वक घडवावी लागते. जी वस्तू घडवायची तिची संकल्पना असणे जरूर असते. निसर्गसौंदर्याची गोष्ट अगदी वेगळी आहे. येथे माणसाने संकल्पनाधिष्ठित अशी निर्मिती केलेली नसते. निसर्गातील एखादा संवेद्य घटक (उदा० सूर्यास्त) पाहताच तो विचारकल्पनादिकांचा आविष्कार आहे असे जाणवते.

आविष्कार म्हटला की विचारकल्पनांचे एका मनातून दुसऱ्या मनात संक्रमण होण्याची संकल्पना सुचणे स्वाभाविक आहे. ही संक्रमणाची संकल्पना वापरूनच कांटने कलांचे विभाजन केले आहे. परंतु या विभाजनाबद्दल त्याने एक इशारा देऊन ठेवला आहे. हे विभाजन परिपक्व विचाराचे फल आहे असे समजू नये असे तो म्हणतो. (कांटने तळटीपेत लिहिले आहे The reader is not to consider this scheme for a possible division of the fine arts as a deliberate theory. It is only one of the various attempts that can and ought to be made.) यावरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही की ललित कलांचे कोणत्या तरी तत्त्वानुसार व्यवस्थीकरण व्हावे हे कांटला पटत होते; पण या व्यवस्थापनाचे तत्त्व आपल्याला गवसले आहे असा त्याचा दावा नव्हता.

कांटच्या म्हणण्याप्रमाणे ललित कलांचे तीन वर्ग पडतात : (१) भाषेचे माध्यम वापरणारी कला (the art of speech) (२) जिच्यात विचारादिकांचे संवेद्य माध्यमात चित्रण होते अशी कला (formative art) (३) संवेदनांचा खेळ असे जिचे वर्णन करता येईल अशी कला (the art of the *play of sensations*) यानंतर या कलाप्रकारांची जास्त तपशीलवार चर्चा केलेली आहे.

(१) भाषेचे माध्यम वापरणाऱ्या कला दोन आहेत : (अ) वक्तृत्व (आ) काव्य. संकल्पनाशक्तीचे एखादे महत्त्वाचे कार्य सफल करणे हा वक्तृत्वाचा उद्देश असतो. परंतु वक्तृत्वकला हे कार्य अशा रीतीने साधते की, कल्पनाशक्तीची मुक्त क्रीडा चालल्यासारखे वाटावे. काव्याचे ह्याच्या उलट असते. काव्य म्हणजे कल्पनाशक्तीची मुक्त क्रीडा होय. पण काव्य ही क्रीडा अशा रीतीने साकार करते की संकल्पनाशक्तीचे एखादे महत्वाचे कार्य सफल करण्याच्या हेतूने ते प्रेरित झाले आहे असे वाटावे. वक्तृत्वाला निश्चित हेतू असतो; पण वक्तृत्वातील प्रत्येक गोष्ट या हेतूने प्रेरित झालेली असते असे नाही. त्यात क्रीडेचा भागही असतो. याच्या उलट काव्यात कसलाही हेतू नसतो. पण याचा अर्थ असा नव्हे की काव्यात कसलाच ताळतंत्र नसतो. काव्यात नियमितता ही असतेच. सौंदर्य व कला यांच्यात नियमरहित नियमितता असते असे कांटने जे वारंवार सांगितले आहे तेच तो येथे निराळ्या शब्दात सांगत आहे. कलेमध्ये सहजता हवी. ओढून ताणून आणलेले किंवा फार जाणीवपूर्वक निर्माण केलेले असे तिच्यात काहीही नसावे. कला दोन अर्थाने स्वतंत्र असते. एकतर पैसे देऊन करून घेतलेल्या कामासारखे कलानिर्मितीचे काम नसते. त्याचबरोबर कोणताही विशिष्ट हेतू










मनात ठेवून केलेल्या कामासारखेही ते नसते. कलेचे स्वरूप क्रीडेसारखे म्हणजे स्वांतःसुखाय केलेल्या कामासारखे असते.

(२) यानंतर कांटने Formative arts चा विचार केला आहे. भाषेचे माध्यम वापरणाऱ्या कला व या कला यांच्यात महत्त्वाचा भेद असा की वक्तृत्व व काव्य यांत शब्दांच्या द्वारे निर्माण होणारी कल्पनाचित्रे असतात पण प्रत्यक्ष इंद्रियांना आवाहन नसते; उलट Formative arts मध्ये प्रत्यक्ष इंद्रियांना आवाहन केलेले असते. या कलांचे दोन भाग पडतात. एकात शिल्प व स्थापत्य यांची गणना होते; तर दुसऱ्यात चित्रकला मोडते. शिल्प व स्थापत्य या कलांमध्ये दृष्टी व स्पर्श या दोन इंद्रियांचा संबंध येतो. चित्रकलेत केवळ दृष्टीचा संबंध येतो. निसर्गात वस्तू जशा असतात तशा त्या दाखविणे हे शिल्पकलेचे उद्दिष्ट असते. निसर्गनिर्मित गोष्टींच्या संकल्पनांचे देहीकरण करणे हे तिचे ध्येय असते. याच्या उलट स्थापत्यकलेत मानवनिर्मित संकल्पना किंवा हेतू यांच्या द्वारा निर्मितीचे नियमन होत असते. अर्थात शिल्प आणि स्थापत्य या कलांमधील कलाकृती दिसायला चांगल्या असणेही जरूर असते. या कलाकृती निर्माण करताना या गोष्टीचे भान ठेवावे लागते. यालाच कांट सौंदर्यहेतू (aesthetic finality) म्हणतो. स्थापत्यकलेचे वैशिष्ट्य हे आहे की तिच्यात जीवनोपयोगितेबरोबर सौंदर्यहेतूही साध्य होतो.

पेंटिंगच्या वर्गात चित्रकलेबरोबर landscape gardening चाही समावेश कांटने केलेला आहे. एखादा भूपृष्ठ गवत, झाडे, फुले, पाणी इत्यादींच्या साहाय्याने सजविणे म्हणजे landscape gardening करणे होय. खोली सजविण्याची कला, पोषाख करण्याची कला यांचाही समावेश कांटने पेंटिंगमध्ये केला आहे. याचे कारण असे की भूपृष्टाची, खोलीची सजावट, कपडे वगैरेंनी केलेली देहाची सजावट या सर्वांचा उद्देश डोळ्यांना सुखवावे हाच असतो. आणि त्याचबरोबर कल्पनाशक्तीच्या स्वैर क्रीडेला प्रोत्साहन देणे हेही कार्य घडत असते. याबद्दल कांट म्हणतो For a *parterre* of various flowers, a room with a variety of ornaments (including even the ladies' attire), go to make at a festal gathering a sort of picture which, like pictures in the true sense of the word, ( those which are not intended *to teach* history or natural science,) has no business beyond appealing to the eye, in order to entertain the imagination in free play with ideas, and to engage actively the aesthetic judgment independently of any definite end.

यानंतर ज्यात संवेदनांचा सुंदर खेळ असतो अशा कलांचा कांटने विचार केला आहे. यात संगीत व रंगकला (art of colour) यांचा समावेश होतो. केवल (pure) स्वर आणि रंग यांच्याविषयी कांटने परिच्छेद १४ मध्ये चर्चा केली होती हे आपल्याला ठाऊकच आहे. तेथे तो असे म्हणतो की Assuming with *Euler* that colours are isochronous vibrations (*pulsus*) of the aether, as tones are of the air set in vibration by sound, and what is most important, that the mind not alone perceives by sense their effect in stimulating the organs, but also, by reflection, the regular play of the impressions, ( and consequently the form in which different representations are united,)– which I, still, in no way doubt– then colour and tone would not be mere sensations. They would be nothing short of the unity of a manifold of sensations, and in that case could even be ranked as intrinsic beauties.

स्वर व रंग यांच्या संवेदनांविषयी याच प्रकारची चर्चा पुन्हा या परिच्छेदात आलेली आहे. या



अनुक्रमणिका






परिच्छेदात कांट म्हणतो Bearing all this in mind we may feel compelled to look upon the sensations afforded by both, not as mere sense-impressions, but as the effect of an estimate of foem in the play of a number of sensations. कांटला हे मत पटत असावे असे परिच्छेद १४ मधील वर दिलेल्या उताऱ्या-वरून वाटते. पण हा प्रश्न समाधानकारक सुटला आहे असा दावा तो करीत नाही. तो इतकेच म्हणतो की संगीत ही नुसती सुखद कला आहे की सुंदर कला आहे हे हा प्रश्न कसा सुटतो यावर अवलंबून आहे.

या सर्व चर्चेत दोन वेगळ्या गोष्टींची गल्लत झालेली आहे असे मला वाटते. जेव्हा आपण संगीताचा विचार करतो तेव्हा आपल्या समोर एक स्वर नसून अनेक स्वरांचा वंदीश असतो. म्हणजे संगीतात नेहमीच अनेकता व तिचे व्यव-स्थापन दोन्ही असतात. तेव्हा संगीतात फॉर्म असतो हे उघडच आहे. परंतु जेव्हा आपण एकच स्वर ऐकतो तेव्हा त्याला सुंदर म्हणायचे की नाही हा अगदी वेगळा प्रश्न आहे. एका स्वरात अनेकता असते की नाही हा प्रश्न आणि संगीतात अनेकता असते की नाहीं हा प्रश्न अगदी वेगळे प्रश्न आहेत. कलास्वरूपाच्या चर्चेत संगीताच्या स्वरूपाला महत्त्व आहे; एका स्वराच्या स्वरूपाला महत्त्व नाही. असे असताना कांट एका स्वराच्या स्वरूपाबद्दल चर्चा का करतो हे कळत नाही.

५२. हा परिच्छेद फारसा महत्त्वाचा नाही. एकाच कलाकृतीत वेगवेगळ्या कला असू शकतात हा मुद्दा कांटने येथे मांडला आहे. नाट्यात वक्तृत्व असते त्याप्रमाणे सर्व गोष्टींना दृश्य स्वरूप देण्या-चाही प्रयत्न असतो. गाण्यात काव्य व संगीत एकत्र येतात; आणि ऑपेरामध्ये या दोन गोष्टी-बरोबर दृश्यताही असते. पद्यात लिहिलेल्या ट्रॅजेडी-मध्ये, नैतिक उपदेश करणाऱ्या काव्यात, किंवा oratorio मध्ये सौंदर्य व भव्यता एकत्र येतात. अशा एकत्रीकरणामुळे ललित कला जास्त कलात्मक होते. प्रत्येक ठिकाणी ती जास्त सुंदर होते असे मात्र खात्रीपूर्वक सांगता येणार नाही. ललित कलेमध्ये दिसायला चांगली असलेली रचना सर्वात महत्त्वाची आहे. ( Still in all fine art the essential element consists in the form which is final for observation and estimating. ) रचनेमुळे मिळणारा आनंद नुसता आनंद नसतो. त्यामुळे मन सुसंस्कृत बनते. बुद्धिजन्य विचारकल्पनांच्या अभिमुख होते. आणि कलाकृतींच्या अवलोकनाने असा विशिष्ट प्रकारचा आनंद अधिकाधिक मिळविण्यांची क्षमता येते (Here the pleasure is at the same time culture, and disposes the soul to ideas, making it thus susceptible of such pleasure and entertainment in greater abundance ) यात संवेदनांची सामग्री, हृद्यता, भावना इत्यादींना महत्त्व नसते. या तीन गोष्टींमुळे नुसती करमणूक होते, पण आत्म्याला चेतना मिळत नाही, त्याला विचारांचे खाद्य मिळत नाही. आणि म्हणून काही वेळानंतर त्यांचा कंटाळा येऊ लागतो; व स्वतःविषयी असमाधान वाटू लागते.

ललित कला व नैतिक संकल्पना यांचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष संयोग झाला नाही तर ललित कलां-मुळे कंटाळा व असमाधान निर्माण होतात. नैतिक संकल्पनांमुळेच स्वयंपूर्ण असा आनंद निर्माण होतो. नुसत्या संवेदनांमुळे होणारे सुख असे स्वयंपूर्ण नसते. या सुखाची सवय झाली की त्याच्याविषयीची भूक वाढत राहते, पण पूर्ण व टिकणारे समाधान मात्र कधीच मिळत नाही. ( where fine arts are not, either proximately or remotely, brought into combination with moral ideas, which alone are attended with a self-sufficing delight, the above is the fate that ultimately awaits them. They then only serve for a diversion, of which one continually feels an increasing need in proportion as one has availed oneself of it as a means of dispelling the discontent of one's








mind, with the result that one makes oneself ever more and more unprofitable and dissatisfied with oneself.)

५३. या परिच्छेदात कांटने ललित कलांची प्रतवारी करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्यामते काव्य सर्व कलांमध्ये श्रेष्ठ कला आहे. ते प्रतिभोत्पन्न असते आणि निश्चित नियमांच्या जोखडापासून मुक्त असते. त्याने मनाची क्षितिजे रुंदावतात कारण ते विशिष्ट संकल्पनेचा आविष्कार करीत असता शब्दांत पकडता येणार नाहीत असे अनंत विचार सूचित करते आणि अशा रीतीने कल्पनाशक्तीला मुक्त विहार करण्याचे स्वातंत्र्य प्राप्त करून देते. काव्यामुळे आपले मन इंद्रियगोचराच्या पलीकडे असलेल्या केवल बुद्धिजन्य संकल्पनांकडे (ideas) वळते. आणि संकल्पनाशक्ती किंवा संवेदनाशक्ती यांच्या आकलनाच्या पलीकडे असलेली निसर्गाची एक बाजू आपल्याला प्रतीत होऊ लागते. आपले मन केवळ निसर्गनियमांनी बांधलेले नाही ते स्वतंत्र व चैतन्यमय आहे अशी आपल्याला जाणीव होते आणि ही जाणीव मनाच्या दृष्टीने बलवर्धक आहे. काव्यव्यवहारात असताना आपण ऐंद्रिय जगाकडे अतींद्रिय तत्वाचे प्रतीक म्हणून पाहू शकतो अर्थात या अतींद्रियतेची जाणीव संवेदनाशक्ती किंवा संकल्पनाशक्ती याच्यामुळे होत नाही.

[ Poetry ( which owes its origin almost entirely to genius and is least willing to be led by precepts or example ) holds the first rank among all the arts. It expands the mind by giving freedom to the imagination and by offering, from among the boundless multiplicity of possible forms accordant with a given concept, to whose bounds it is restricted, that one which couples with the presentation of the concept a wealth of thought to which no verbal expression is completely adequate, and by thus rising aesthetically to ideas. It envigorates the mind by letting it feel its faculty-free, spontaneous, and independent of determination by nature- of regarding and estimating nature as phenomenon in the light of aspects which nature of itself does not offer us in experience, either for sense or understanding, and of employing it accordingly in behalf of, and as a sort of scheme for, the supersensible. ] कांटने काव्याला इतके महत्त्व का दिले हे समजणे थोडे कठीण आहे. जर ऐंद्रियतेकडून अतींद्रियतेकडे जाण्याची क्षमता असणे हाच निकष असेल तर चित्रकला, संगीत या कलामध्येही ही क्षमता असते असे जाणकार म्हणतात. काही संगीतामुळे साक्षात्कारासारखा धार्मिक अनुभव येतो; चित्रकलेत विश्वशांती स्वर्ग व नरक इत्यादी केवळ बुद्धिजन्य संकल्पनांना साकार करण्याचे प्रयत्न झालेले आहेत. असे आहे तर काव्याची विशेष अशी मातबरी काय? काव्याचे वैशिष्टच हे की ऐंद्रियतेचा कमीत कमी उपयोग त्यात होतो. इतर कलांच्या मानाने ऐंद्रिय शरीर फारच किरकोळ असते आणि पुष्कळ वेळा ते आपल्या शारीर गुणांकडे वाचकांचे लक्ष वेधून घेत नाही. कमीत कमी ऐंद्रियता व जास्तीत जास्त अतींद्रिय आशय असे काव्याचे स्वरूप असते. (अर्थात कल्पनाशक्तीला प्रतीत होणाऱ्या प्रतिमांचा समावेश काव्यशरीरात केला तर ऐंद्रियतेचे प्रमाण पुष्कळ वाढेल हे खरे. पण प्रत्यक्ष रंग पाहणे व रंगाची कल्पना करणे यात फरक आहे हे विसरून चालणार नाही.) वर उल्लेखिलेला भेद सोडला तर काव्य व इतर कला यांच्यात अतींद्रियव्यंजनाच्या दृष्टीने डावे उजवे कसे करणार हे कळत नाही.

वक्तृत्व म्हणजे दुसऱ्याचे मन वळविण्याची कला असे म्हटले तर त्याच्या उपयोगाच्या मर्यादा स्पष्ट आहेत. एखाद्याला त्याच्या विवेकशक्तीला पटतील










असे मुद्दे मांडून विशिष्ट दिशेने कार्यान्वित करणे वेगळे आणि त्याची विवेकशक्ती बाजूला सारून त्याचे मन वळविणे वेगळे. वरीलपैकी दुसरी गोष्ट त्याज्य आहे. जरी सन्मार्गाकडे मन वळवायचे असेल तरी वक्तृत्वाचा उपयोग करणे योग्य नाही. माणूस सन्मार्गाकडे वळला याला जितके महत्त्व आहे तितकेच महत्त्व तो योग्य कारणांसाठी तिकडे वळला याला आहे. माणूस योग्य कारणाकरिता सन्मार्गाकडे वळला नाही तर त्याची विवेकशक्ती दुबळी राहते. केवळ वक्तृत्वावर अवलंबून राहिले तर माणूस जसा सन्मार्गाला जाईल त्याप्रमाणे अनीतीच्या मार्गाकडेही वळेल. म्हणून जीवनातील महत्त्वाच्या गोष्टींविषयी जेथे निर्णय घ्यायचा असेल तेथे वक्तृत्व नको असे कांटचे मत आहे.

हृद्यता व मानसिक प्रचोदन ( mental stimulation ) यांच्या दृष्टीने विचार करता काव्याच्या सर्वात जवळ येणारी कला म्हणजे ध्वनीची कला ( the art of tone ) होय. ही कला व काव्य यांचे अगदी स्वाभाविकपणे मीलन घडते. काव्यात आणि या कलेत भेद आहे हे खरे. काव्य पुष्कळ वैचारिक खाद्य पुरविते; ध्वनिकलेचा प्रांत संवेदना असल्याने ती असले खाद्य पुरवू शकत नाही. परंतु ती विविध प्रकारे मनाचे प्रचोदन घडवून आणते आणि तिचा परिणामही तीव्र असतो. परंतु मन सुसंस्कृत करण्याच्या बाबतीत ही कला इतर कलांच्या मानाने फार खालच्या दर्जाची आहे. मनोरंजन करणे इतकेच तिचे कार्य असते. आणि म्हणून तिच्यात वैविध्याला फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले दिसते. तिच्या ठिकाणी असलेली सार्वत्रिक हृद्यता ( charm ) खालील कारणांमुळे निर्माण होते. भाषेतील प्रत्येक आविष्काराला संलग्न असा आणि आविष्कृत अर्थाला अनुकूल असा एक ध्वनी असतो. या ध्वनीवरून बोलणाऱ्याच्या मनांत कोणत्या प्रकारची चलबिचल झाली आहे हे कळते. आणि त्यायोगे बोलणाऱ्याच्या मनातला विचारादि आशय ऐकणाऱ्याच्या मनात उत्पन्न होतो. आवाजातील फेरबदलांच्या (modulation) द्वारा माणसाच्या संवेदना इतर सर्वांना कळतात. आवाजातील फेरबदल ही संवेदनांची सर्वांना कळेल अशी भाषाच म्हणता येईल. या भाषेची शक्ती ध्वनिकलेतही असते. ध्वनिकलेला भावनादिकांची ( affections ) भाषा म्हणता येईल. या ध्वनींमुळे त्यांच्याशी साहचर्यनियमांनी निगडित असलेल्या aesthetic ideas ही एका मनातून दुसऱ्या मनात संक्रांत होतात. परंतु या ideas ना ज्ञानद अशा निश्चित संकल्पनांचे स्वरूप नसते. म्हणून येथे भाषेऐवजी संवेदनांची रचना अर्थवाहनाचे कार्य करते. भाषेच्या द्वारे जसे निश्चित विचार व्यक्त होतात तसे या संवेदनांच्या रचनेच्या द्वारे होत नाही. पण जे भाषेत व्यक्त होणार नाहीत, किंवा भाषेत व्यक्त करता येणार नाहीत, अशा विचारांच्या भरगच्च व सेंद्रिय बंधाचे वाहन मात्र या रचनेच्या द्वारे होते.

[ Further, just as modulation is, as it were, a universal language of sensations intelligible to every man, so the art of tone weilds the full force of this language of the affections, and in this way, according to the law of association, universally communicates the aesthetic ideas that are naturally combined with it. But, further, in as much as those aesthetic ideas are not concepts or determinate thoughts, the form of the arrangement of these sensations ( harmony and melody ); taking the place of a form of a language, only serves the purpose of giving an expression to the aesthetic idea of an integral whole of an unutterable wealth of thought that fills the measure of a certain theme forming the dominant *affection* in the piece ]

येथे संवेदनांच्या संवादित्वात जी प्रमाणबद्धता आढळते तिनेच हे अर्थवाहनाचे कार्य होते. ( This purpose is effectuated by means










of a propertion in the accord of the sensations ) ही प्रमाणबद्धता गणिताच्या परिभाषेत मांडता येऊ शकेल. या प्रमाणबद्धतेमुळेच संगीताचा आनंद इतर सौंदर्यनिंदासारखा सार्वत्रिक होतो. ( Although this mathematical form is not represented by determinate concepts, to it alone belongs the delight which the mere reflection upon such a number of concomitant or conscentive sensations couples with this their play, as the universally valid condition of its beauty, and it is with reference to it alone that taste can lay claim to a right to anticipate the judgment of every man.)

संगीत व गणीत यांच्यातील संबंधाविषयी वर जे लिहिले आहे त्यामुळे कदाचित एखाद्याचा गैरसमज होईल याच जणू भीतीने कांट असे स्वच्छ सांगतो की संगीताची हृद्यता आणि संगीतामुळे मनाचे होणारे प्रमोदन यांचा व गणिताचा अर्थाअर्थी काहीच संबंध नाही. म्हणजे संगीताचा आनंद प्राप्त होण्यासाठी त्याच्यामागचे गणीत कळायला हवे असे नाही. संगीतातील एकत्र येणाऱ्या व बदलणाऱ्या संवेदनांमधील प्रमाणबद्धता निर्माण व्हायची असेल तर अवकाशातील हवेची विशिष्ट स्पंदने इत्यादी अस्तित्वात असणे जरूर असते. आणि या स्पंदनादिकांबद्दल गणिती भाषेत बोलता येते. पण ही स्पंदने किंवा गणिती भाषेत मांडता येतील असे त्यांच्यातील संबंध काही आपल्याला जाणवत नाहीत. आपल्याला जाणवतात संवेदना व त्यांच्यातील संबंध. यासाठी आपण दुसरे एक उदाहरण घेऊ. आपल्याला पिवळा रंग दिसायचा असेल तर प्रकाशलहरींमध्ये विशिष्ट वेगाच्या हालचाली घडायला हव्यात. त्या घडल्या नाहीत तर आपल्याला पिवळा रंग दिसणार नाही. पण आपण पाहतो पिवळा रंग; प्रकाशलहरींच्या हालचाली आपल्याला दिसत नाहीत. आणि या हालचालींबद्दल आपल्याला काहीही माहिती नसली तरी आपल्याला पिवळा रंग दिसू शकतो. तसेच संगीतामागचे पदार्थविज्ञान किंवा गणीत यांची आपल्याला अजिबात माहिती नसली तर संगीत कळू शकते. संगीत ऐकताना आपल्याला प्रत्यक्ष जाणवतात संवेदना व त्यांच्यातील संबंध. या संबंधातील प्रमाणबद्धता अशी असते की सर्व संवेदना एका वेळी ग्रहण करता येतात; एका स्वराने दुसरा स्वर नष्ट केला आहे असे कधी होत नाही. वेगवेगळ्या स्वरांची अशी रचना होते की तिच्यामुळे मनाचे सतत प्रचोदन होत राहते. आणि तत्संलग्न भावनांची कंपने निर्माण होऊन प्रशांत आत्मसुखाचा अनुभव येतो.

[ But mathematics, certainly, does not play the smallest part in the charm and movement of the mind produced by music. Rather is it only the indispensable condition (*conditio sine qua non* ) of that proportion of the combining as well as changing impressions which make it possible to grasp all in one and prevent them from destroying one another, and to let them, rather, conspire towards the production of a continuous movement and quickening of the mind by affections that are in unison with it, and thus towards a serene self enjoyment ]

संगीताविषयी इतके सर्व लिहिल्यावरही कांट संगीताला फारसे वरचे स्थान देण्यास तयार नाही. कलेमुळे मनाला जी सुसंस्कृतता प्राप्त होते ती निकष म्हणून वापरली तर संगीताला फार खालचे स्थान द्यावे लागेल असे तो म्हणतो. निराळ्या भाषेत सांगायचे तर असे म्हणता येईल की ज्ञानप्रक्रियेत ज्या ज्ञानशक्तींचा संगम होतो त्यांना पुष्ट करणे हा जर निकष मानला तर संगीताला सर्वांत खालचे स्थान द्यावे लागेल कारण संगीत म्हणजे निव्वळ संवेदनांचा खेळ होय ! त्या मानाने कांट ज्यांना Formative arts म्हणतो त्यांना किती-










तरी वरचे स्थान द्यावे लागेल असे तो म्हणतो. या विषयावरची कांटची मते मुळीच पटणारीं नाहीत. सौंदर्यानुभवात ज्या मनःशक्तीचा वापर होतो त्या म्हणजे संकल्पनाशक्ती आणि कल्पनाशक्ती या होत. सौंदर्यानुभवात या मनःशक्तींचे स्वैर मीलन अभिप्रेत आहे. कल्पनाशक्तीने उत्स्फूर्तपणे संवेदनांची अशी गुंफण करायची की ज्यामुळे निश्चित संकल्पनेच्या अभावीदेखील संकल्पनाशक्तीचे समाधान व्हावे. संगीतात ज्ञानशक्तींचे असे स्वैर मीलन निश्चित घडते. संगीत म्हणजे सुखद संवेदनांची रांग नव्हे. या संवेदनांत नियमितता निश्चित असते. खरे म्हणजे स्वायत्त सौंदर्याचा सर्वात उत्तम नमुना संगीतातच बघायला मिळतो.

संगीताविरुद्ध कांटने जे मुद्दे उपस्थित केले आहेत त्यातला शेवटचा मुद्दा मोठा मजेशीर आहे. तो म्हणतो की संगीताच्या आराधनेत एक प्रकारचा सभ्यतेचा अभाव अभिप्रेत आहे. संगीताचे स्वर चोहोकडे पसरतात; आणि म्हणून ज्यांना ते ऐकावयाचे नसतात त्यांच्याही कानावर ते आदळतात. व अशा रीतीने इतरांच्या स्वातंत्र्यावर संगीतामुळे मर्यादा पडतात. चित्रकलेचे असे नसते. एखादे चित्र बघावयाचे नसले तर दुसरीकडे पाहिले की काम होते. संगीताची आक्रमकवृत्ती चित्रकलेत नसते. लाउडस्पीकरचा शोध लागल्यापासून मोठ्या शहरांमध्ये फिलमी संगीत तासचे तास जो हैदोस घालू लागले आहे तो ऐकल्यावर कांटचे मत मनोमन पटते. मला तर असे वाटते की आमच्या लहान मुलांनी आईवडिलांचे शब्द जितका वेळ ऐकले आहेत त्यापेक्षा जास्त वेळ लता–आशा यांची गाणी त्यांना ऐकावी लागली आहेत.

५४. जे नुसते बघितल्याबरोबर आनंद देते व जे केवळ संवेदनसुख देते यांच्यातील फरकाविषयी कांटने आधी लिहिले आहे. संवेदनेवर आधारलेले सुख सार्वत्रिक असते असा दावा आपण करू शकत नाही. हे सुख म्हणजे माणसाच्या एकूण सुस्थितीची जाणीव– विशेषतः शारीरिक सुस्थितीची जाणीव– होय. संवेदनांच्या खेळामुळे जो आनंद होतो तो याच प्रकारचा असतो. संवेदनांच्या खेळामुळे जसे सुख मिळते तसेच ज्ञानद नसलेल्या विचारांच्या खेळामुळेही मिळते. संगीत व विनोद ही या प्रकारच्या खेळाची चांगली उदाहरणे म्हणून दाखविता येतील. येथे नुसत्या बदलाच्या जाणिवेने सुख होते. (त्याच्या आधी संगीत म्हणजे संवेदनांचा खेळ असे कांटने म्हटले होते. त्याचबरोबर ज्ञानद नसलेल्या विचारांचा आविष्कार संगीत करते असेही त्याने म्हटले होते. या दोन विचारांपैकी दुसरा विचार कांटच्या मनात येथे असावा असे वाटते.) संगीत व विनोद यामुळे जे प्रचोदन होते ते शारीरिक असते असे कांट म्हणतो. विनोदात या प्रचोदनाचा उगम मानसिक असला तरी तिचा शेवट शारीरिक सुस्थितीच्या जाणिवेत होतो. ही जाणीव विचारांच्या खेळाबरोबर चालणाऱ्या आतड्यांच्या स्पंदनामुळे निर्माण होते.

( Music, on the contrary, and what provokes laughter are two kinds of play with aesthetic ideas, or even with representations of the understanding by which, all said and done, nothing is thought. By mere force of change they yet are able to afford lively gratification. This furnishes pretty clear evidence that the quickening effect of both is physical, despite its being excited by ideas of the mind, and that the feeling of health, arising from a movement of the intestines answering to that play, makes up that entire gratification of an animated gathering upon the spirit and refinement of which we set such store. ) कांट याच्याही पुढे जाऊन म्हणतो की संगीत व विनोद यांच्यामुळे जे सुख प्राप्त होते ते स्वरसंगतीचे किंवा विनोदवृत्तीच्या आविष्काराचे आपल्याला जे ज्ञान होते त्यामुळे निष्पन्न होत नाहीं. आतडी व त्यांच्यावर आणि फुप्पुसांच्या खाली जो पडदा असतो यांच्यात ज्या हालचाली होतात आणि त्यामुळे शारीरिक सुस्थि-











तीची जी जाणीव निर्माण होते त्यांच्यावरच केवळ हे सुख अवलंबून आहे.

[ Not any estimate of harmony in tones or flashes of wit, which, with its beauty, serves only as a necessary vehicle, but rather the stimulated vital functions of the body, the affection stirring the Intestines and the diaphragm, and, in a word, the feeling of health ( of which we are only sensible upon some such provocation ) are what constitute the gratification we experience at being able to reach the body through the soul and use the latter as the physician of the former. ]

संगीतात ही प्रक्रिया अशी होते : प्रथम शारीरिक संवेदनांचा खेळ चालतो. त्यामुळे मनात विचारादिकांचे स्पंदन सुरू होते; व मग पुष्ट झालेल्या या हालचालींचा ओघ पुन्हा शरीराकडे वाहू लागतो. विनोदांत (jest) ही प्रक्रिया वेगळी असते. तेथे प्रथम वैचारिक पातळीवर हालचाली सुरू होतात; व मग त्यांचा ओघ शरीराकडे वळतो. विचारप्रक्रिया सुरू झाली की संकल्पनाशक्तीत काही अपेक्षा निर्माण होतात. परंतु विनोदात ज्या विचारप्रक्रिया अभिप्रेत असतात त्यांच्याकडून संकल्पनाशक्तीच्या अपेक्षांची पूर्ती होत नाही. अपेक्षापूर्ती न झाल्याने संकल्पनाशक्तीची पकड ढिली होते. त्यामुळे शारीरिक अवयवांमध्ये स्पंदन सुरू होते. त्याचा परिणाम म्हणजे या अवयवांमध्ये शरीराच्या सुस्थितीला पोषक अशी समतानता निर्माण होते.

( In this presentation the understanding, missing what it expected, suddenly lets go its hold, with the result that the effect of this slackening is felt in the body by the oscillation of the organs. This favours the restoralion of the equilibrium of the latter, and exerts a beneficial influence upon the health. )

गदगदून हसू फुटायचे असेल तर ज्यात बुद्धीला आनंद मिळणार नाही असा मूर्खपणा (something absurd ) समोर असायला हवा. जेव्हा खूप ताणलेल्या अपेक्षेच्या पदरी अचानक भोपळा येतो तेव्हा हास्यनिर्मिती होते. ( Laughter is an affection arising from a strained expectation being suddenly reduced to nothing ) या अपेक्षाभंगामुळे संकल्पनाशक्तीला आनंद मिळणे शक्य नाही; तरी त्यापासून अप्रत्यक्षपणे आनंद मिळतो हे खरे आहे. त्याअर्थी या आनंदाचा उगम विशिष्ट शारीरिक प्रक्रिया व त्यांचा आपल्या मनावर झालेला परिणाम यांच्यात असला पाहिजे. विनोदात अभिप्रेत असलेला अपेक्षाभंग म्हणजे एक विचारांची क्रीडा आहे; त्यामुळे आपल्या शरीरांतील शक्तींमध्ये समतानता निर्माण होते.

[ येथे जाताजाता एक गोष्ट नमूद करायला हवी. कांटचा रिचर्ड्‌सवर किती परिणाम झाला होता त्याचे आपल्याला येथे प्रत्यंतर येते. रिचर्ड्‌सच्या सौंदर्यसिद्धांतात प्रेरणांच्या समतानतेला (eqilibrium of impulses) किती महत्त्वाचे स्थान आहे हे आपल्याला ठाऊक आहेच. त्यातल्यात्यात परस्परविरोधी प्रेरणांचे संतुलन रिचर्ड्‌सच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. परस्परविरोधी गोष्टींचा समन्वय ( reconciliation of opposites ) ही संकल्पना कांटच्या सौंदर्यविचारात प्रथमच ठसठशीतपणे मांडलेली आढळते. त्याच्या सिद्धांतातील परस्परविरोधी गोष्टी म्हणजे संकल्पनाशक्ती आणि संवेदनाशक्ती या होत. त्यातली एक पूर्णपणे चैतन्यमय आहे व दुसरी पूर्णपणे जड आहे. सौंदर्यानुभवात या दोघींमध्ये समन्वय साधला जातो कारण संवेदनाशक्ती उत्स्फूर्तपणे संकल्पनाशक्तीला अभिमुख झालेली दिसते. नियमबद्धतेवरचा कटाक्ष हा संकल्पनाशक्तीचा विशेष होय. सौंदर्यानुभवात संवेदनांची रचना उत्स्फूर्तपणे अशी होते की त्या रचनेत नियमरहित नियमितता निर्माण झालेली असते व अशा रीतीने संवेदनाशक्तीकडून उत्स्फूर्तपणे संकल्पनाशक्तीचे समाधान होते. परस्परविरोधी










गोष्टींच्या समन्वयाची ही संकल्पना कोलरिजने इंग्रजी समीक्षाशास्त्रात आणली. त्याच अंकुराला आलेले एक फळ म्हणजे रिचर्ड्सची मूल्यमीमांसा होय. परंतु कांटला ज्ञानशक्ती अभिप्रेत होत्या व रिचर्ड्सला प्रेरणा अभिप्रेत आहेत हा भेद विसरून चालणार नाही. त्या दृष्टीने रिचर्ड्सच्या अगदी जवळ येणारा कांटचा विचार म्हणून कांटच्या विनोदावरील भाष्याकडे बोट दाखविता येईल. ]

अपेक्षाभंगावर आधारलेल्या विनोदाची एकदोन उदाहरणे कांटने दिली आहेत ती मनोरंजक आहेत : ( १ ) सुरतेच्या एका इंग्रजी व्यापाऱ्याकडे एक हिंदी माणूस गेला. त्या व्यापाऱ्याने बीअरची बाटली उघडली. तिच्यातून खूप फेस आला. त्यावर हिंदी माणसाने मोठा अचंबा व्यक्त केला. त्यात अचंबा वाटण्यासारखे काय आहे ? असे विचारल्यावर तो हिंदी माणूस म्हणाला की ' फेस बाहेर पडतो आहे याचे मला आश्चर्य वाटत नाही. हा सर्व फस तुम्ही बाटलीत कसा भरला याचे मला आश्चर्य वाटत आहे ' दुसरे उदाहरण एका सधन माणसाच्या वारसदाराचे आहे. तो सधन माणूस वारला तेव्हा त्याचा अंत्यविधी मोठ्या प्रमाणावर करायचे वारसदाराने ठरविले. त्यासाठी पैसे देऊन शोक करायला लोक बोलावले. परंतु त्यामुळे त्याच्या अपेक्षेविरुद्ध अशी गोष्ट घडली. त्याबद्दल तो म्हणतो की शोक करायला बोलाविलेल्या लोकांना मी जितके जास्त पैसे देतो तितके ते लोक आनंदी दिसू लागतात.

या ठिकाणी कांटने एक इशारा दिला आहे. त्याला अभिप्रेत असलेला अपेक्षाभंग म्हणजे ताणलेल्या अपेक्षेतून काहीही निष्पन्न न होणे होय. अपेक्षाभंग झाला म्हणजे कित्येक वेळा ज्याची अपेक्षा केली त्याच्या बरोबर विरुद्ध गोष्ट घडते. आणि ही विरुद्ध असलेली गोष्ट तापदायकही असू शकते. त्यापासून हास्य निर्माण होत नाही. ( we must be careful to observe that the reduction is not one into the positive contrary of an expected object–for that is always something, and my frequently pain us – but must be reduction to nothing ) एखादा माणूस एखादी गोष्ट सांगायला सुरुवात करून आपल्या अपेक्षांना ताण देतो. पण शेवटी ती गोष्ट खोटी आहे असे लक्षात येऊन आपला विरस होतो. उदा. अतिशय दुःखामुळे एका रात्रीत आपले केस कसे पांढरे झाले असे जर कोणी सांगितले तर त्यामुळे आपल्याला आनंद मिळत नाही. उलट जर एखाद्याने सांगितले की अमुक अमुक व्यापाऱ्याचा वादळामुळे सत्यानाश झाल्याने त्याच्या डोक्यावरील केसांचा टोप एका रात्रीत पांढरा झाला तर आपल्याला मोठी गंमत वाटेल, कारण हा सर्वच कल्पनेचा खेळ आहे.

विनोदामध्ये असे काहीतरी असले पाहिजे की ज्यामुळे आपली क्षणभर फसवणूक झाली पाहिजे. मग भ्रमनिरास झाल्यावर आपले मन पुन्हा एकदा मागे वळून पाहते व एकदा जे अनुभवले ते पुन्हा निर्माण करू लागते. या सर्व प्रक्रियेत मनावरचा ताण वाढणे व एकदम कमी होणे या गोष्टी वारंवार व जलद गतीने होतात. अशा रीतीने मानसिक स्पंदन सुरू होते व त्याबरोबर संवादी असे शारीरिक स्पंदनही सुरू होते. हे सर्व आपल्या इच्छाशक्तीमुळे घडत नसून आपोआप घडते. त्यामुळे आपण दमतो हे खरे. पण हे दमणेही सुखद व शारीरिक सुस्थितीला पोषकच असते. या शारीरिक प्रक्रियेचे स्वरूप कांटने थोडक्यात स्पष्ट केले आहे. तो म्हणतो की अशी कल्पना करू या की आपल्या सर्व विचारांच्या जोडीला संवादी अशी शारीरिक हालचाल होत असते. वर वर्णन केलेले स्पंदन ( ताण वाढणे व एकदम कमी होणे ) चालू झाले की आपल्या आतड्यातील लवचिक भागांमध्येही संवादी स्पंदन ( आकसणे व एकदम सैल पडणे ) सुरू होते. आतडी व फुप्फुस यांच्यामधील पडद्यातही असेच स्पंदन चालू होते. त्याचा परिणाम फुप्फुसांवर होतो व त्यातली काही हवा एकदम बाहेर टाकली जाते; मग या जलद रेचकाला अवरोध होतो; आणि मग पुन्हा काही हवा झपाट्यात बाहेर पडते. ही सर्व प्रक्रिया शरीराच्या सुस्थितीला पोषक असते. ज्या विचारांमुळे ज्ञानादी गोष्टी अजिबात मिळत नाहीत








त्यांच्यापासून सुख कसे प्राप्त होते हे कळण्यासाठी आपल्या मनात काय घडते इकडे लक्ष न देता आपल्या शरीरात काय घडते इकडे लक्ष द्यायला हवे असे कांट म्हणतो. ( This alone, and not what goes on in the mind, is the proper cause of the gratification in a thought that at bottom represents nothing. ) हास्यामुळे होणारे सुख शारीरिक असते असा निष्कर्ष कांटने काढला आहे.

कांटच्या विनोदावरील भाष्यावर मला दोन आक्षेप घ्यावेसे वाटतात : (१) कांटने जी उदाहरणे अपेक्षाभंगाची म्हणून दिलेली आहेत ती अनौचित्याची ( incongruity ) उदाहरणे आहेत असे वाटते. बीअरच्या बाटलीतून निघालेल्या फेसाचे उदाहरण घ्या. त्या हिंदी माणसाच्या बोलण्याने हसू येते याचे कारण अपेक्षाभंग होतो हे नाही. जी गोष्ट बाटलीतून बाहेर येते ती केव्हातरी त्या बाटलीत भरली गेली असली पाहिजे हा इतर ठिकाणी लागू पडणारा नियम त्या हिंदी माणसाने बीअरच्या फेसालाही लावला यात अपेक्षाभंग नसून अनौचित्य आहे. सर्व ठिकाणी अनौचित्यामुळे हास्य निर्माण होईल असे नाही. काही वेळा दुःख, संताप वगैरे निर्माण होतील. पण जेव्हा अनौचित्यामुळे काही नुकसान होणार नसेल, किंवा नुकसान झाले तरी त्याकडे आपण थोडेसे तटस्थ व खिलाडु वृत्तीने पाहू शकत असलो तर मात्र अनौचित्यामुळे हास्य निर्माण होईल. अर्थात अनौचित्य म्हणजे अनौचित्याबद्दलच्या अपेक्षेचा भंग असे म्हटले तर ही सर्व टीका गैरलागू ठरते हे खरे; पण तरीही अपेक्षाभंग व अनौचित्य या संकल्पना वेगळ्या आहेत असे वाटतच राहते. (२) कांटने विनोदावर लिहिताना शारीरिक प्रक्रियांना जे स्थान दिले आहे ते योग्य नाही असे मला वाटते. या प्रक्रियांविषयी कांटने जे लिहिले आहे ते सर्व खरे आहे असे धरून चालू. आता प्रश्न असा की त्यामुळे विनोदाच्या स्वरूपावर काही प्रकाश पडतो का ? त्याने हास्याच्या स्वरूपावर प्रकाश पडतो हे खरे. कारण हास्य ही एका अर्थाने शारीरिक प्रक्रियाच आहे. गुदगुल्या झाल्यामुळे निर्माण होणारे हास्य आणि विनोदी किस्सा ऐकल्यामुळे होणारे हास्य या दोघातही शारीरिक प्रक्रिया समान आहे. पण जे समान नाही तेच येथे महत्त्वाचे आहे. विनोदी किस्सा ऐकल्यावर एक विशिष्ट मानसिक प्रक्रिया घडते; गुदगुल्या झाल्यावर ही प्रक्रिया होत नाही. विनोदामुळे निर्माण होणाऱ्या हास्याचे वैशिष्टच हेच की त्याच्या मुळाशी एक विशिष्ट प्रकारची मानसिक प्रक्रिया असते. ( अनौचित्याची जाणीव असे या प्रक्रियेचे वर्णन करता येईल ) म्हणून हास्य जरी शारीरिक असले तरी विनोदामुळे होणाऱ्या हास्याचे विश्लेषण करताना केवळ शारीरिक प्रक्रियेला महत्त्व देऊन चालणार नाही; त्याच्या मुळाशी असलेल्या मानसिक प्रक्रियेला तितकेच, किंवा जास्तच, महत्त्व द्यायला हवे. हास्यरसाच्या मुळाशी जी प्रक्रिया असते ती शारीरिक नसून मानसिक असते. फार तर वर निर्देशिलेली शारीरिक प्रक्रिया ही हास्यरसग्रहणातील एक आवश्यक घटक म्हणता येईल; पण ती प्रक्रिया झाली ( आणि तिच्या मुळाशी आपल्याला अभिप्रेत असलेली मानसिक प्रक्रिया नसली ) तर हास्य निर्माण होईल पण हास्यरस निर्माण होणार नाही. आपल्याला कर्तव्य आहे हास्यरसाशी; नुसत्या हास्याशी नाही. पुन्हा वरील शारीरिक प्रक्रिया हास्यरसाला आवश्यक तरी आहे का ? हास्यरसाचा आस्वाद घेणे म्हणजे हसून मुरकुंडी वळणे असे असेल तरच या शारीरिक प्रक्रियेला आवश्यक म्हणता येईल. पण पुष्कळ वेळा हास्यरसाचा अनुभव घेताना आपण नुसते स्मितच करतो. अशावेळी रसास्वाद असतो पण कांटने वर्णन केलेल्या आतडी, फुप्पुसे इत्यादिकांच्या हालचाली मात्र नसतात. याचा अर्थ असा की कांटने दिलेली शारीरिक प्रक्रिया हास्यरसास्वादातील एक आवश्यक घटक म्हणून तरी मानायची का ? याबद्दल शंका उत्पन्न होते.










श्री. ग. वा. तगारे

# रामचंद्रपंडितकृत " भावार्थबोधिनी "

अप्रकाशित ग्रंथांचे संशोधन करीत असता कोल्हापूर येथील श्रीसिद्धेश्वर महाराज यांचे घराण्यात सिद्धेश्वर महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव रामचंद्रराव यानी " भावार्थ बोधिनी " या नावाचा केलेला भगवद्गीतेचा मराठी अभंगानुवाद मिळाला. भगवद्गीतेच्या प्रत्येक श्लोकाला एक श्लोक, ओवी, आर्या किंवा अभंग रचून गीतेचा संदेश सामान्य मराठी भाषिकापर्यंत पोचवण्याचे कार्य वामन मुक्तेश्वर, मोरोपंत, तुकारामपंत क्षीरसागर (तुका–पांडुरंगदास) इ. कवीनी केले आहे. 'शाब्दे परे च निष्णातः' असा तत्कालीन लौकिक असलेल्या रामचंद्र पंडित या संतकवींचा प्रस्तुत अनुवाद चांगल्यापैकी असून तो प्रकाशनीय असून उपेक्षित राहिल्यामुळे त्याची ओळख प्रस्तुत लेखात करून देत आहे.

इ. स. १८३० मध्ये समाधिस्त झालेल्या या संतकवीचे चरित्रविषयक टिपण मी भांडारकर इन्स्टिट्यूटच्या नियतकालिकात मागेच ( Annals of BORI Poona Vol. XXXV 1955 पृ. २०२ व पुढे ) प्रसिद्ध केले असल्यामुळे मी त्याची पुनरुक्ती येथे करीत नाही.

## रामचंद्रपंडित विरचित

### 'भावार्थ बोधिनी' पोथी वर्णन

प्रस्तुत पोथी देशी कागदावर काळ्याभोर शाईने सुंदर हस्ताक्षरात देवनागरी लिपीत काळजीपूर्वक स्वच्छ व स्पष्ट लिहिलेली असून हिची १२० पाने आहेत. श्रीसिद्धेश्वरमहाराज व रामचंद्र पंडित यांची रचना एकत्र बाइंड केलेल्या या पोथीच्या पानाची लांबी व रुंदी अनुक्रमे २८ सें. मी. × १५.५ सें. मी. असून मूळ पृष्ठांचा आकार बाइंडिंग करताना कापला गेल्यामुळे यापेक्षा अधिक असावा. मूळ लेखनिकाने पृष्ठसमास भरपूर सोडल्यामुळे सुदैवाने या पोथीतील उजव्या व डाव्या बाजूस १ सें. मी. व वरील व खालील बाजूस सुमारे २ सें. मी. समास शिल्लक राहिला असून मजकुरातील अक्षरे शाबूत आहेत. प्रत्येक पृष्ठात २२ ओळी असून प्रत्येक ओळीत सामान्यतः १८ अक्षरे आहेत. या लिपीतील 'अ' उत्तरभारती वळणाचा (अ) आहे.

पोथीची सुरवात पुढील प्रमाणे आहे :

॥ श्रीमद्भगवद्गीता अभंग प्रारंभः ॥
वंदूनी श्रीराम पूर्णपरब्रह्म ।
विश्रांतीचें धाम योगीयाचें ॥ १ ॥
आमुचा जनक सिद्धेश्वर गुरू ।
भवसिंधूचें तारूं भावें वंदूं ॥ २ ॥
भीष्मपर्वि व्यासें ग्रथित भगवद्गीता ।
तियेच्या भावार्था प्राकृत वर्णु ॥ ३॥
आतां गीता उपदेशाचे कारण ।
ऐका श्रोतेजन **राम** म्हणे ॥४॥

या प्रास्तविक अभंगात मंगलाचरण व ग्रंथप्रयोजन सांगितल्यावर श्रीमद्भगवद्गीतेची पार्श्वभूमी व उपोद्घात पुढील अभंग २ ते ५ यात विशद केले आहेत. ते म्हणतात :

'आपल्या दात्याचे ऐश्वर्य आकलन न झाल्यामुळे याप्रमाणे अज्ञ माणसे काहीतरी अन्नआच्छादन मागतात पण राजेलोक आपल्या नावाला साजेसा परामर्श घेतात त्याप्रमाणे अर्जुनाने ' भगवद्भक्ती नेणुनीयां " सारथी हो " ऐसें वीनविले.' पण श्रीकृष्णाने ती विनंती मान्य केली पण मनातून योजले की–

देह रथ, घोडे इंद्रियांचा गण ।
वागोरे हें मन आवरूनि तें ॥२॥
करू प्रत्यक्ष्रवण देऊ यासि ज्ञान ।

(अभंग ३ रा)

–पण अडचण अशी होती की परंपरेप्रमाणे अर्जुन शरण आला नाही तोपर्यंत त्यास उपदेश करता येत नाही म्हणून श्रीकृष्णाने पुढील चमत्कार केला :

माया घालुनीयां पार्थ भ्रांत केला ।
म्हणुनी खिन्न जाला युद्ध समई ॥१॥



अनुक्रमणिका






नातरी पार्थासी नाहीं काय ठावें ।
आतां कां बोलावें नेणीलेंसें ॥२॥
काहीं न सुचावें आपणा शरण यावें ।
म्हणुनी केशवें ऐसें केलें ॥३॥
(अभंग ४था)

अशारीतीने अर्जुनाला शरण आणून श्रीकृष्णाने अर्जुनाला 'परोक्ष उपदेश' केला.

प्रस्तावनेच्या ५ व्या अभंगात भगवद्गीतेत चर्चा केलेल्या प्रमुख प्रश्नांचा उल्लेख केला आहे. त्यांचे मते भगवंताला नुसती कृपा येऊन भागत नाही. शिष्याने (अर्जुनाने) प्रश्न विचारल्याखेरीज विवेचन करता येत नाही. या प्रस्तावनेचा सांधा गीतेतील १ ल्या श्लोकाशी जोडून ग्रंथास आरंभ केला आहे. तो मूळ अभंग असा आहे :

कृपा आली तरी प्रश्नाच्या अनुसारें ।
करावें उत्तर ऐशी रीती ॥ १॥
म्हणुनी सांख्य कर्म ब्रह्मार्पण योग ।
संन्यास अष्टांगयोग पुढे ॥ २ ॥
ज्ञानविज्ञानाचा योग बोलुनि अंतीं ।
सप्तमी श्रीपती प्रश्न बिज ॥ ३ ॥
सुचवी ब्रह्मादीक सप्त हे पदार्थ ।
प्रश्न करि पार्थ अष्टमी तो ॥ ४॥
तेथोनी पार्थासी ज्ञानाचा उपदेश ।
करिल जगदीश ते संगती ॥ ५॥
व्यासें वर्णियेली धृतराष्ट्रें तेथें ।
आधी संजयाते प्रश्न केला ॥ ६ ॥
तेथुनी आरंभ भगवद्गितेचा ।
ऐका अर्थ त्याचा **राम** म्हणे ॥ ७ ॥

येथून पुढे भगवद्गीतेच्या प्रत्येक श्लोकाचा एका अभंगात अर्थ देताना संस्कृत श्लोक खाली व वर दुरेघी मारून तांबडया शाईने लिहिला आहे. व मराठी अभंग काळया शाईने लिहिला आहे. भगवद्गीता अध्याय १ श्लोक १ ते ८ असे दिल्या-नंतर ९ व्या श्लोकापासून संस्कृत श्लोकांची जागा हिंगुळाने रंगवून त्या पार्श्वभूमीवर काळ्या शाईने संस्कृत श्लोक लिहून त्याची दुरेघी चौकट तांबडया शाईची आहे प्रत्येक अध्यायाचे शेवटी 'इतिश्रीमद्भगवद्गीतासूप-निषत्सु ...... 'चे भाषांतर पुढील अभंगात दिले असून प्रत्येक अध्यायाचा अनुक्रम व विषय याचे अनुरूप आवश्यक ते शब्द वापरुन हा अभंग १८ ही अध्यायाना वापरला आहे. उदाहरणार्थ १२ वे अध्यायाची पुष्पिका :

श्रीकृष्ण अर्जुन दोघांचा संवाद ।
हें उपनिषद गीताशास्त्र ॥ १ ॥
योगशास्त्रिं ब्रह्मविद्या जे बोलीली ।
ते आम्हा माउली भगवद्गिता ॥ २ ॥
'**भक्तियोग**' नाम द्वादश रमणीय ।
जाहाला अध्याय संपुर्ण तिचा ॥ ३ ॥
गुरुकृपे त्याचें वर्णिलें म्या गुज ।
**सित्धेश्वरात्मज** राम म्हणे ॥

१८ अध्याय पूर्ण झाल्यावर टीकेच्या उपसंहारात आपण यथाशक्ती केलेली ही टीका रामचंद्र प्रभूला अर्पण केली व ही टीका सज्जनानी कृपया 'गुरुकृपे करूनी पाहावी' असे विनवून आपली गुरुपरंपरा स्पष्ट केली आहे. ते म्हणतात :

अभंग छंदानें वर्णिला प्राकृत ।
वाणीने भावार्थ श्री गीतेचा ॥ १ ॥
टीका करायाचें सामर्थ्य तों नाहीं ।
परी वदलें कांहीं यथाशक्ती ॥ २ ॥
गुरुकृपेकरूनी पाहावी सज्जनी ।
ते कृपा करूनी मजवरी ॥ ३ ॥
न्यून पूर्ण होतें ज्याचें घेतां नाम ।
सद्गुरू श्रीराम त्याचे चरणी ॥ ४ ॥
हे गीता **भावार्थबोधिनी** ग्रंथिली ।
पूर्ण समर्पीली सद्भावाने ॥ ५ ॥
पद्मनाभ—> चतुर्मुख—> सनकादीक—> ।
—> नारद—> व्यास—> शूक—> पूर्णानंद—> ॥६॥
—> ज्ञानानंद—, अमृतराय —> सित्धेश्वर ।
तयाचा किंकर **राम** म्हणे ॥ ७ ॥

पोथीच्या शेवटी संस्कृतमधील पुष्पिका पुढीलप्रमाणे आहे :

इति श्रीमद् भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रीमद् योगिवर्य श्री **सित्धेश्वरसूनु—श्रीरामचंद्र पंडित**—विरचिता **भावार्थ-बोधिनी** टीका समाप्तः (प्ता) ॥ श्रीमत्सीता रामचंद्रा-






र्पणमस्तु ॥ शके १७४२ विक्रम नाम संवत्सरे उदगयने शिशिर्र्क्तौ माघे मासे शुक्लपक्षे दशम्यायां तिथौ रविवासरे तद्दिनी करवीरक्षेत्रे इदं लेखनं समाप्तं ॥ ६ ६ ॥ ६ ॥

या पृष्ठाचे पाठीमागील बाजूस लेखनिकाने प्रत्येक अध्यायवार 'संगति', 'श्लोकटीका' 'समाप्ति' व 'येकुन' या चार शीर्षकाखाली अभंगसंख्येचे पृथक्करण करून एकूणात दिली ती अशी :

१. संगति (प्रास्तविक, गीताध्यायसंगतिदर्शक अभंग इ.) – २१

२. श्लोकटीका – ७००

३. समाप्ति (अध्यायाचे शेवटच्या पुष्पिकांचा अभंगानुवाद) – १९

[ १८ अध्यायाचे शेवटी २ अभंग ] आहेत.

एकूण ७४०

## गीताध्याय संगती

रामचंद्र पंडित परंपरेने पढलेले संस्कृतपंडित असून त्यांचे 'ईशावास्योपनिषद् भाष्य' (प्रकाशनआनंदाश्रम पुणे) त्यांचा वेदांतावरील अधिकार व संस्कृत पांडित्य दाखविण्यास पुरेसे आहे. बहुजनसमाजाला गीता 'प्राकृत' अभंगातून उपलब्ध करून देताना श्रीकृष्णाचा विशिष्ट दृष्टिकोन त्यानी 'संगति' दर्शक अभंगातून व गीताटीका असणाऱ्या अभंगातून स्पष्ट केला आहे. अर्जुनाने अज्ञानामुळे भगवंताचे सामर्थ्य न जाणता त्याला सारथी होण्याची विनंती केली. पण अर्जुनावर कृपा करण्यासाठी भगवंताने आपल्या मायेने त्याला व्यामोह निर्माण केला व त्याच्या शंकांचे व प्रश्नांचे निरसन करीत या भगवद्गीतेत त्याला ब्रह्मज्ञान दिले. ही रामचंद्रपंडितांचे दृष्टीने गीतेची पार्श्वभूमी आहे. ही पार्श्वभूमी तत्कालीन सर्वसामान्य लोकासाठी– 'भोळीसाबडी नुपेक्षावी' या सद्भावनेतून निर्माण झाली-आहे हे उघड आहे. शंकरादि आचार्यांच्या प्रस्तावनातून व्यक्त होणाऱ्या भूमिकेपेक्षा ही भिन्न आहे कारण 'भावार्थबोधिनी' ज्या वाचकासाठी लिहिली तो वाचकवर्ग अनपढ, श्रद्धाळू होता.

दुसऱ्या अध्यायाची प्रस्तावना व्यासानी पहिल्या अध्यायाच्या ऐतिहासिक पार्श्वभूमीवर केल्यामुळे तिची संगती सांगण्याचे कारण नाही. पण २ रा अध्याय व ३ ऱ्या अध्यायात काय संगति आहे हे पंडितानी पुढील शब्दात सांगितले आहे :

पूर्वी कृष्णें सांख्यज्ञान बोलियेलें ।
पुढें सांगितले कर्म अघवें ॥ १ ॥
स्थिति प्रज्ञयाची मग सांगे स्थिती ।
उपसंहरी अंतीं ज्ञाननिष्ठा ॥ २ ॥
म्हणुनी संदेह अर्जुनाचे मनि ।
कोण श्रेष्ठ दोनीमध्यें ऐसा ॥ ३ ॥
**राम** म्हणे पूसे यास्तव अर्जुन ।
अध्याय तेथून तृतीय हा ॥ ४ ॥

–प्रत्येक अध्यायाचे प्रस्तावनेदाखल असे अभंग रचून त्यानी गीताध्याय संगती पुढीलप्रमाणे मांडली आहे :

२ ऱ्या अध्यायात ज्ञानयोग व ३ ऱ्यात कर्मयोग सांगितल्यावर

'चित्तशुद्धी नाही ज्ञान न ठसावे ।
अवश्य करावे कर्म तेणे ॥ २ ॥
याची परंपरा सांगोनिया मग ।
ब्रह्मार्पण योग ज्ञानासहित ॥ ३ ॥ हे ४ थ्या अध्यायाचे प्रयोजन आहे.

पूर्वी 'परिग्रहत्याग' सांगून नंतर कर्मयोगाचे वर्णन केले आहे. तेंव्हा 'कर्मयोग आणि कर्माचा संन्यास । न घडे येकास येके काळी' अशा संदेहात अर्जुन पडून त्याने कृष्णाला निश्चित मार्ग ५ व्या अध्यायाचे सुरवातीस विचारला; पण श्रीकृष्णाने कर्मसंन्यासाचे विवेचन करताना समारोपात अत्यंत संक्षेपाने "स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यान् ...... यः सदा मुक्त एव सः" (५.२७–८) असा ध्यानयोगाचा उल्लेख केला आहे. याचा संदर्भ घेऊनः

ध्यानयोगें वीण केवल संन्यासे ।
मुक्ती नाहिं ऐसें बोलावया ॥ २ ॥
तोचि सांग योग वर्णिजेल येथ ।
शुध्द चित्त तेथें अधीकारी ॥ ३ ॥
चित्तशुद्धिस तो कारण कर्मची ।
म्हणुनी आधि तेंची कृष्ण सांगे ॥ ४ ॥
राम म्हणे तोची षष्ठ हा अध्याय ।
त्याचा अभिप्राय आता वर्णु ॥ ५ ॥

भगवद्गीतेची १ ली षडाध्यायी कर्मपर व दुसरी षडाध्यायी भक्तिपर, १ ली 'तत्' पद, दुसरी












' त्वम् ' पद व तिसरी ' असि ' पद विवेचन करणारी. अशारीतीने गीता " तत्त्वमसि ' वरील भाष्य आहे इ. रूढ मते रामचंद्र पंडित मानत नाहीत. त्यांचे-मते भगवद्गीता एक एकसंध, अखंड, ग्रंथ आहे व प्रत्येक अध्याय पूर्वीच्या अध्यायातील विषयाचे किंवा विषयाच्या अपूर्ण राहिलेल्या विशिष्ट विभागाचे विवेचन आहे मग त्याबद्दल अर्जुनाचा प्रश्न असो वा नसो. उदा. ७ व्या अध्यायाचे प्रारंभी अर्जुनाचा प्रश्न नसताना भगवंताने " मय्यासक्त मनाः पार्थ ... " इ. व्याख्यान दिले आहे. त्याचा ६ व्या अध्यायाशी काय संबंध आहे ?

रामचंद्र पंडित म्हणतात : ६ व्या अध्यायाचे शेवटी " श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमः मतः " ( ६.४७ ) असे भगवंताचे " भजन करि तोची। श्रेष्ठ ऐसि साची भगवद्वाणी " वाक्य ऐकून,

निष्काम कर्म जें त्याहूनि विलक्षण ।
कैसे तुझें भजन देवराया ।।

–आणि हे तुझे भजन तरी कसे करावे अशा संदेहात अर्जुन पडला. त्यांचे शंकानिरसन ७ व्या अध्यायात केले आहे. हे निरसन करताना त्या अध्यायाचे शेवटी ' ब्रह्मादिक सात पदार्थ ' यांचा उल्लेख केला त्यांचे लक्षण जाणून घेण्याकरिता अर्जुनाने ' किं तद् ब्रह्म– ' ( ८·१ ) हा प्रश्न केला व त्याचे उत्तर ' अक्षर ब्रह्म ' या ८ व्या अध्यायात दिले. पण त्या अक्षरब्रह्माचे " वीवरण करूनिया " ' तयाचे ऐश्वर्य लोकविलक्षण । सांगावें म्हणून अध्याय हा ' ।। अशी ९ व्या अध्यायाची प्रस्तावना केली आहे.

भगवद्गीतेच्या ७ व्या अध्यायात " रसोहमप्सु कौन्तेय इ. ( ७·८–११ ) व ९ व्या अध्यायात ' अहं क्रतुरहं यज्ञः इ. स्वतःच्या विभूती भगवंतानी अर्जुनाला सांगितल्या. पण अर्जुनाने ' तुझ्या आणखी कोणकोणत्या विभूती आहेत ? ' असे कृष्णाला विचारले नाही. तेव्हा भगवंताच्या 'विभूतींची व्याप्ती अर्जुनाचे मनात न ठसल्यामुळे व "एकदेशी ज्ञानी सिध्दी नाही । " म्हणून

अर्जुने जाणावी अपुली सर्व व्याप्ती ।
ऐसी कृष्णचित्तीं आली कृपा ।।
म्हणुनी सर्वव्याप्तीसहीत विभूती ।
बोलतो श्रीपती न पुसतां ।।

– हे १० व्या अध्यायाचे प्रयोजन आहे. या अध्यायाचे शेवटी " विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत् " ( १०·४२ ) असे आपले विश्वव्यापक-स्वरूप आहे असे भगवंताने सांगितल्यावरून अर्जुनाने त्याला विश्वरूपदर्शनाचा आग्रह धरला त्याचे वर्णन ११ व्या अध्यायात आले आहे.

कृष्णाने ११ व्या अध्यायाचे शेवटी ( ११·५५ ) ' मत्कर्मकृन्मत्परमो ... स मामेति पाण्डव ' ।। अशी भक्ताची प्रशंसा केली पण मागे ( ७·१८–९ ) मध्ये ' ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ' इ. ज्ञान्याची प्रशंसा केली. तेव्हा :

**गीताध्याय संगती**

ज्ञानी निर्गुणाची उपासना करिती ।
भक्त उपासीती सगुणाते ।।२।।
दोघांमाजी कोण श्रेष्ठ हें जाणाया ।
पार्थ देवराया प्रश्न करी ।। ३।।
तेथून अध्याय द्वादश तयाचा ।
राम म्हणे साचा भाव वर्णु ।।४।।

भक्तियोगाचे वर्णन करताना ( १२·१३–१९ ) या श्लोकात ' पूर्ण स्थितिमंतांची लक्षणे ' सांगितली. पण तत्त्वज्ञानाशिवाय आंधळी भक्ती अपुरी असल्यामुळे

सांगाया विवेक प्रकृती-पुरुषाचा ।
क्षेत्र-क्षेत्रज्ञाचा सांगुनिया ।। ३।।
ज्ञानाचे लक्षण ज्ञानाचे साधन ।
ज्ञेयवस्तु कृष्ण सांगताहे ।।४।।
राम म्हणे तोची त्रयोदश अध्याय । '

रामचंद्र पंडित १२ व्या अध्यायाअखेर ' उपासनाकाण्ड ' नावाचा गीतेचा दुसरा खंड संपला असे न मानता १३ वा अध्याय हा १२ व्यातील विषयाला पोषक आहे इतकेच नव्हे तर गीतेमध्ये असे कृत्रिम खंड पाडणे त्याना नामंजूर असून गीता एक अविभाज्य, ग्रंथ आहे असे ते मानतात असे दिसते.

१३ व्या अध्यायाचे शेवटी ( १३. ३४ मध्ये ) ' साधन सुटायाचें प्रकृतिपासून । हें जाणति ते जन मुक्त होती ' असे कृष्णाने सांगितल्यामुळे मुक्तीचे साधन कोणते मुक्ताची लक्षणे कोणती ( १४. २२-६ ) ही सांगणे भाग होते. पण ती १४ व्या अध्यायात सांगताना " ब्रह्मणो ही प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्यच ' ( १४. २७) असे म्हटल्यामुळे '










तें आपुलें तत्त्व अर्जुनें जाणावें ।
कृपेनें सांगावे परी त्यासी ।।२।।
तें ज्ञान प्रपंच समूळ हा जाण ।
दुर जाल्यावीण ठसेनाचि ।। ३ ।।
म्हणुनी प्रपंच छेदाचें साधन ।
पार्था सांगे कृष्ण पूर्वी येथें ।। ४ ।।

—१५ व्या अध्यायातील चर्चा संपविताना कृष्णाने 'हे ज्ञान जाणूनि कृतकृत्य ज्ञानी ' ( १५.२० ) होतो असे सांगितल्यावर, ' या ज्ञानाचा अधिकारी कोण ', ' मला याबाबतीत अधिकार आहे की नाही ' अशी पार्थाला शंका आली आहे हे जाणून—

त्याचे वीवचेन करूनियां ।। ३ ।।
' तुं अधिकारी ' ऐसे पार्था अश्वासावे ।
त्यागार्थ सांगावे अनधिकारी ।। ४ ।।

—म्हणून १६ व्या अध्यायाचा प्रपंच केला. ही चर्चा करताना ' टाकुनीया शास्त्रवीधी वर्ते जो इच्छेने । तया नाहीं ज्ञान ' ( यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः इ. १६.२३-२४ ) असे कृष्णाने स्पष्ट केले. हा संदर्भ घेऊन—

शास्त्रविधी टाकुन करी स्व इच्छेने ।
परंपरेकरून पाहुनि कांहीं ।। ३ ।।
तेथें निष्ठा धरी तो येथें अधिकारी ।
आहे नाहि हरी तें मज सांगे ।। ४ ।।

—असा ' ये शास्त्रविधिमुत्सृज्य रजस्तमः । ...... (१७.१) १७ वा अध्याय हा १६ व्याला कसा पूरक आहे असे दाखविले आहे.

१८ वा अध्याय हा समारोपाचा असल्यामुळे पूर्वीच्या अनेक अध्यायातील विषय त्यात आले आहेत व त्यामुळे या अध्यायाचे औचित्य सांगताना १८ व्या अध्यायाचे प्रस्तावनेत रामचंद्रपंडित म्हणतातः

मोक्ष हेतु दैवी सात्विक संपत्ती ।
वदला हे श्रीपती पूर्वी (अध्याय १६.५) मग ।।१।।
सकळ सात्विक क्रिया फळ त्यागें ।
वदिलें हें श्रीरंगे पूर्वाध्यायी ।। २ ।।
तेव्हां भासे त्याग हे मुख्य साधन ।
संन्यास साधन वदला पूर्वी ।। ३ ।।
पंचम अध्यायी तेव्हां दोनी येक ।
अथवा दोन्ही पृथक् हे जाणावे ।। ४ ।।

ऐसे मनि म्हणुनी पार्थ करी प्रश्न ।
अध्याय तेथून अठरावा हा ।। ५ ।।
सकळ गीतेचा सारभूत त्याचा ।
भाव वर्णु साचा राम म्हणे ।। ६ ।।

गीताध्यायसंगती वाचताना द्वैत, विशिष्टाद्वैत किंवा अद्वैत मताच्या दावणीला गीता बांधण्याचा प्रयत्न न करता सामान्य माणसाला गीतामाऊलीचे बोल साध्या सोप्या भाषेत ऐकवावेत एवढीच भूमिका रामचंद्र पंडितानी घेतली आहे. मी दुसऱ्या लेखात दाखविल्याप्रमाणे भगवद्गीतेच्या प्रत्येक श्लोकातील प्रत्येक शब्दाचा अर्थ करण्यात प्रस्तुत ग्रंथकार दक्ष आहेत. भगवद्गीतेचे कर्म-भक्ति-ज्ञान असे षडध्यायी द्वारा तुकडे करणे किंवा गीतेत केवळ तत्-त्वं-असि पदाचे व्याख्यान आहे अशा कृत्रिम आग्रहाला वा परंपरेला बळी न पडता गीता हा अविभाज्य, अखंड, अध्यायातून अध्याय निसर्गतः वाढणाऱ्या इक्षुदंडाप्रमाणे निर्माण होत आहेत असा कर्म-उपासना-ज्ञान यांचा समवाय असणारा ग्रंथ आहे असे या गीताध्याय संगतीवरून वाटते.

### इतर गीतानुवादातील स्थान

ज्ञानेश्वरकालापासून रामचंद्र पंडितापर्यंत अनेक गीतानुवाद झाले. त्यापैकी समश्लोकी किंवा प्रत्येक श्लोकास एक असे अभंगगीतात्मक अनुवाद लक्षात घेता रामचंद्र पंडितांच्या "भावार्थ-बोधिनी" चे स्थान पहिल्या दर्जाचे वाटण्याइतके ते सरस आहेत. जरी यानी शक्य तितका शब्दशः अर्थ देण्याचा प्रयत्न केला तरी त्यांचा मुख्य उद्देश प्रत्येक श्लोकाचा "भावार्थ" देणे हा आहे व तो त्यांच्या तत्कालीन सामान्य जनतेसाठी लिहिला गेला आहे. आणि तशा दृष्टीने तो उद्देश कितपत सफल झाला आणि हा अनुवाद प्रत्यक्ष कसा आहे हे वाचकानी स्वतः अजमावण्यासाठी मी येथे एक उतारा ' स्थितप्रज्ञाचीं लक्षणे ' देत आहे.

[ श्लोक व अभंग भिन्न टाईपमध्ये छापण्यासाठी श्लोकाखाली रेघ मारली आहे. मूळ पोथीत श्लोकासाठी हिंगूळ वापरून तो मजकूर अभंगा पेक्षा भिन्न दाखविला आहे. ]

### स्थित प्रज्ञ-लक्षणे

।। अर्जुन उवाच ।।

**स्छि ( स्थि ) तप्रज्ञस्य का भाषा**
**समाधिस्छ (स्थ)- — स्य केशव ।**






स्छि (स्थि) तधीः किं प्रभाषेत
किमासीत व्रजेत किं ( किम् ) २.५४

( भावार्थ बोधिनी ) – – – – – – – – – – –

ज्याची बुध्दि देवा पावलीसे स्थिती ।
तयासी म्हणती स्थितप्रज्ञ ॥ १ ॥
समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें लक्षण ।
सांगे वीवरण करूनियां ॥ २ ॥
स्थितप्रज्ञ कैसें करी तो भाषण ।
कैसें आचरण राहाणे कैसें ॥ ३ ॥
राम म्हणे ऐसा आयकोनि प्रश्न ।
उत्तर श्रीकृष्ण सांगे आतां ॥ ४ ॥ ॥ ५४ ॥

॥ श्रीभगवानुवाच ॥

५५ प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः
स्छि( स्थि )तप्रज्ञस्तदोच्यते ॥

( भावार्थ–बोधिनी )

जेऱ्हां पार्था सर्व काम मनोगत ।
टाकुनी राहात स्व स्वरूपिं ॥ १ ॥
स्वयेंची संतुष्ट स्थितप्रज्ञ त्यासी ।
बोलताति ऐसी कृष्णवाणी ॥ २ ॥
सांगुनी लक्षण आतां नारायण ।
सांगतो भाषण राम म्हणे ॥ ३ ॥ ॥ ५५ ॥

५६. दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ॥
वीतरागभयं (य) क्रोधः
स्छि (स्थि) तधीर्मुनिरुच्यते ॥

दुःखीं ज्याचे मना क्षोभ कदा नाहिं ।
आणी सूखिं पाहीं नाहीं इछा (च्छा) ॥१॥
प्रीति, भय, क्रोध न जयाचे मनि ।
स्थितप्रज्ञ मुनी बोलीला तो ॥२॥
राम म्हणे पुन्हा तें चि नारायण ।
सांगतो लक्षण भाषणाचे ॥३॥ ॥५६॥

५७. यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभं (म्)।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्टि ( ष्ठि ) ता ॥

भा. बो.

इष्ट पावोनीयां न पावे जो हर्ष ।
अशुभीं ज्यासि द्वेष नाहीं कहीं ॥१॥
स्नेह ज्यासि नाहीं सर्वत्र विषई ।
त्याची बुध्दि पाहीं स्थिर झाली ॥२॥
नित्य उदासीन भाषण तो करी ।
एसें बोले हरी राम म्हणे ॥३॥ ॥५७॥

५८. यदा संहरते चायं कूर्मोंगा (ङ्गा) नीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥

भा. बो.

सर्व अंगें आवरोनी कूर्म जैसा ।
राहतसे तैसा स्थितप्रज्ञ ॥१॥
जेऱ्हां योगि सर्व विषयापासुनी ।
इंद्रीयें फिरऊनी स्थिर राहे ॥२॥
प्रतिष्ठा पावली त्याची बुध्दि जाण ।
ऐसें बोले कृष्ण राम म्हणे ॥३॥ ॥५८॥

५९. विषया विनिवर्तंते (न्ते) निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥

भा. बो.

इंद्रीयें न करी विषय ग्रहण ।
त्याचे विषय जाण दूर होती ॥ १ ॥
परि जे आवडी मनी वीषयाची ।
दूर नोहे साची कदापि ते ॥ २ ॥
ब्रह्म जाणुनि जो स्थितप्रज्ञ नर ।
त्याची होय दूर आवडि ही ॥ ३ ॥
स्थितप्रज्ञ नोहे नियमा वांचून ।
ऐसे बोले कृष्ण राम म्हणे ॥ ४ ॥ ॥ ५९ ॥

६० यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति ( न्ति ) प्रसभं मनः ॥

भा. बो.

विवेकी जो नर करी मोक्षिं यत्न ।
तयाचेंहि मन बळात्कारे ॥ १ ॥
क्षोभक इंद्रियें वोढोनी आणीती ।
विषईं लावीती तेऱ्हां कैसीं ॥ २ ॥
त्याची बुध्दि पार्था स्थिरता पावेल ।
ऐसा कृष्ण बोल राम म्हणे ॥ ३ ॥ ॥ ६० ॥

६१ तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥

भा. बो.

म्हणोनि इंद्रियें सर्व आटोपुनी ।
मत्पर होउनी राहो युक्त ॥ १ ॥
सर्वही इंद्रियें ज्यासि वश जालीं ।
प्रतिष्ठा पावली त्याची प्रज्ञा ॥ २ ॥



अनुक्रमणिका






ऐसें राहणे आतां मन आटोपावें ।
वदिजे हें केशवें राम म्हणे ॥ ३ ॥ ॥ ६१ ॥

**६२ ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात्संजायते कामः कामात्क्रोधोभिजायते ॥**

भा. बो.

विषयाचे ध्यान करी अहर्निशीं ।
आवडी तयासी उपजे तेथें ॥ १ ॥
मग ' मज पाहीजे ' ऐसी इछा होत ।
न मिळतां येत क्रोध त्यासी ॥ २ ॥
राम म्हणे क्रोधें जे कां पूढें होय ।
तेंही सांगताहे कृष्ण आता ॥ ३ ॥

**६३ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुध्दिनाशो बुध्दिनाशात्प्रणश्यति ॥**

भा. बो.

क्रोध तो आलीया कार्याकार्य न कळे ।
मोहें स्मृति चळे मान( ण )साची ॥ १ ॥
स्मृतिभ्रंशें बुध्दी स्थिर कदां नव्हे ।
बुध्दिनाशें पावे नाश नर ॥ २ ॥
राम म्हणे आतां स्थिर जाहालें मन ।
तयाचें लक्षण कृष्ण सांगे ॥ ३ ॥

**६४ रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥**

भा. बो.

रागद्वेषहीन मनाचे स्वाधीन ।
विषय भोगिं जाण इंद्रियें ज्याची ॥ १ ॥
तें मन स्वाधीन तत्त्वता जयासी ।
पावे तो शांतीसी नित्य नर ॥२॥
प्रसाद पावल्या प्राप्त होय स्थिती ।
तें सांगे श्रीपती राम म्हणे ॥३॥ ॥६४॥

**६५. प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुध्दिः पर्यवतिष्ठते ॥**

भा. बो.

प्रसाद जाहलीया सर्व दुःख जाय ।
प्रसन्न तें होय चित्त तेणें ॥१॥
चित्त जालें जया पुरुषाचें प्रसन्न ।
त्याची बुध्दि तूर्ण स्थिर होय ॥२॥
राम म्हणे आतां अनियामियास ।
सुख नाहिं ऐसें कृष्ण सांगे ॥३॥ ॥६५॥

**६६. नास्ति बुध्दिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।**
**न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखं ( म् ) ॥**

भा. बो.

अयुक्त नरासी स्थिरबुध्दि नाहीं ।
ध्यान त्यासि कहिं न घडेची ॥१॥
न घडे ध्यान ज्यासि कैंचि शांति त्यासी ।
सुख अशांतासी कोठूनियां ॥२॥
राम म्हणे ऐसे सांगूनिया कृष्ण ।
इंद्रियांचें दमन पुन्हा सांगे ॥३॥ ॥६६॥

**६७. इंद्रियाणां हि चरतां यन्मनोनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥**

भा. बो.

इंद्रीयें वर्तती आपूले विषयांत ।
अनुकूल त्यांत मन ज्यासी ॥१॥
तें इंद्रिय साधकाची प्रज्ञा हरी ।
वायू जळांतरी नौके जैसा ॥२॥
म्हणोनी इंद्रियें आटोपून धरी ।
ऐसें बोले हरी राम बोले ॥ ३ ॥ ६७ ॥

**६८ तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥**

भा. बो.

यास्तव इंद्रियें सर्वविषयांतुनी ।
राहीलीं परतूनी स्थीर ज्याचीं ॥ १ ॥
पार्था त्याची प्रज्ञा प्रतिष्ठा पावली ।
ऐसी माझि बोली सत्य जाण ॥ २ ॥
सांगुनि आचरण आतां त्याचें पाहणे ।
सांगीजेते कृष्णें राम म्हणे ॥ ३ ॥ ६८ ॥

**६९ या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥**

भा. बो.

सर्वा या भुतांसी नुमजे जेथें कांहिं ।
आत्मस्थिति पांहीं यासी रात्री ॥ १ ॥
तेथे स्थीतप्रज्ञ तो असे जागता ।
स्वरूप तत्त्वता जाणे म्हणुनी ॥ २ ॥
सर्वा वीषयांत भुतें ही वागती ।
यास्तव जागृती त्यांसी येथें ॥ ३ ॥
आत्मज्ञानि तेथें भेदातें न पाहे ।
म्हणुनी तेथें आहे त्यासी रात्री ॥ ४ ॥












राम म्हणे आतां लोकज्ञेय स्थीती।
सांगत श्रीपती आत्मज्ञाची ॥ ५ ॥

७०. आपूर्यमाणमचलप्रतिष्टं ( ष्ठं )
समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे
स शांतिमाप्नोति न कामकामी ॥

भा. बो.
आधी परिपूर्ण तया समुद्रांत ।
जळ प्रवेशत नानाविध ॥ १ ॥
आपूली मर्यादा परि तो न टाकेची ।
तैसी आत्मज्ञाची स्थिती आहे ॥ २ ॥
प्रारब्धें सर्वाही पावे विषयाप्रति ।
परी आत्मस्थीती न ढळेची ॥ ३ ॥
आत्मज्ञ तो नर नित्य शांति पावे ।
विषई न पावे या शांतितें ॥ ४ ॥
राम म्हणे म्हणुनी टाकावा हा काम ।
हें बोले विश्राम योगीयांचा ॥ ५ ॥ ७० ॥

७१. विहाय कामान् यः सर्वान्
पुमांश्चरति निस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥

भा. बो.
प्राप्त सर्व कामी उपेक्षा जो करी ।
अप्राप्ती न धरी इछा काहीं ॥ १ ॥
अहंकारशून्य ममतारहित ।
तो शांती पावत भोग भोगी ॥२॥
उक्त ज्ञाननिष्ठा तिचा उपसंहार ।
करी तो श्रीवर राम म्हणे ॥३॥७१॥

७२. एषा ब्राह्मी स्छि(स्थि)तिः पार्थ
नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्छि(स्थि)त्वास्यामंतकालेऽपि
ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥

भा. बो.
सांगीतलि ब्रह्मनिष्ठा तूज पार्था ।
इथेतें सर्वथा पाउनियां ॥ १ ॥
मोहातें न पावे अंतकाळिं येथें ।
राहोनी पावत ब्रह्मीं लय ॥ २ ॥
पुर्वीच जो राहे तो ब्रह्मीं लय पावे ।
हें काय बोलावें ऐसा भाव ॥ ३ ॥
ज्ञाननिष्ठेप्रति तये काळिं ऐसें ।
स्तवीलें जगदीशें राम म्हणे ॥ ४ ॥

श्रीमद्भगवद्गीतेचा संदेश सुबोध भाषेत बहुजन-समाजापर्यंत पोचवण्याचा हा प्रयत्न आज सुद्धा आवश्यक आहे. मतामतांच्या गलबल्यात गीतार्थाची ओढाताण होत असलेल्या काळात श्रीकृष्णाने नेमके काय सांगितले हे रामचंद्र पंडितानी प्रासादिक भाषेत विशद केले आहे. या ' भावार्थबोधिनीचीं चिकित्सित आवृत्ती काढण्यासाठी मला या ग्रंथाची हस्तलिखिते कुणाकडे असतील तर ती पाठभेदादि नमूद करण्यासाठी हवी आहेत. वाचकानी कृपया याबाबतीत आवश्यक ती माहिती पुरवावी ही विनंती.

प्रस्तुत पोथी मला अभ्यासास दिल्याबद्दल या पोथीचे मालक व रामचंद्र पंडिताचे वंशज श्री. यशवंत-राव महाराज पंडित या माझ्या स्नेह्यांचे आभार मानणे उचित व आवश्यक आहे.










## वाचकांचा पत्रव्यवहार

संपादक 'नवभारत'

स. न. वि. वि.

'नवभारत' च्या जून अंकातील श्री. म. दा. गाडगीळ यांचा लेख व त्यावरील जुलै अंकातील चिकित्सकाचे पत्र वाचले. चिकित्सकाने या लेखाची एवढी चिकित्सा करण्याचे कारण नव्हते, कारण त्याची जरूरी नाही, असे वाटते. लेखकाने विज्ञान आणि तत्त्वज्ञान यांची खिचडी करून इतका वैचारिक गोंधळ निर्माण केला आहे की त्याची चिकित्सा करणेच शक्य नाही. जीवात्म्याविषयीचे अद्वैत तत्त्वज्ञानाचे विचार कसे बरोबर आहेत हे दाखवून देण्यासाठी विज्ञानाचा आधार घेणाऱ्या व DNA पासून क्वासारपर्यंत (क्वेसेझर हे चुकीचे आहे.) भरारी मारणाऱ्या लेखकाच्या बुद्धिमत्तेचे कौतुक करावे तितके थोडेच आहे. अद्वैत तत्त्वज्ञानाला विज्ञानाच्या कुबड्यांची जरूरी नाही हे लेखकाला कळत नसेल तर त्याला अद्वैत (नव्हे कोणतेच) तत्त्वज्ञान समजलेले नाही असे म्हणणे भाग आहे. लेखक विज्ञानाचा अभ्यासी असल्याची खात्री चिकित्सकाला वाटत असेल तर चिकित्सक विज्ञानाच्या बाबतीत किती अनभिज्ञ आहे हे फार तर स्पष्ट होईल. आईन्स्टाईनने "इ. स. १९१६ मध्ये Unified Field Theory चा आपला शोध जगापुढे ठेवला," व "विश्वातील सर्व पदार्थ व सर्व प्रकारच्या शक्ति यांच्या एकात्मतेचा सिद्धांत जगाच्या निदर्शनास आला" या लेखकाच्या विधानावरून इतिहास बदलण्याची व 'एकात्मते' चा अर्थ बदलण्याची पाळी आली आहे. (आईन्स्टाईनने Unified Field Theory चा सिद्धांत १९५० साली मांडला व अजून अशी एकात्मता साधण्यात आलेली नाही.) लेखक म्हणतो त्याप्रमाणे "जड पदार्थामध्येही विशिष्ट परिस्थितीत संवेदन व जीवन यांचा आविर्भाव होतो हे सिद्ध झाले" असेल तर संवेदन व जीवन या शब्दांचेही अर्थ बदलण्याची पाळी आली आहे. आणि अद्वैत तत्त्वज्ञानातील जीवात्म्याविषयीचे विचार खरे ठरविण्यासाठी हे सर्व करणे लेखकाला आवश्यक वाटत असेल तर आपण का तक्रार करावी ? आणि त्याची चिकित्सा तरी कशाला करावी ?

— अद्वयानंद गळतगे.

---





अनुक्रमणिका








## पुस्तक-परामर्श

**सहवासातून :** भाई माधवराव बागल; प्रकाशक: श्री. व. ह. पिटके, 'जीवनकल्याण, कोल्हापूर शुगर मिल्स, कोल्हापूर, पृष्ठे २०६; किंमतः दिलेली नाही.

मागे एकदा एक विनोद वाचनात आला होता. एक नटी आपल्या मैत्रिणीला आपल्याबद्दल बराच वेळ खूप काही सांगत होती. तासभर बडबडल्यानंतर ती म्हणाली – 'अय्या, आतापर्यंत मी माझ्याबद्दलच बोलले ! आता तुझ्याबद्दल काही सांग की ! आता सांग बघू मला-माझे कोणकोणते चित्रपट तू पाहिलेस ?

माधवराव बागल यांचे 'सहवासातून' हे पुस्तक वाचल्यानंतर त्या नटीची आठवण व्हायला तसं कारण आहे. आपल्या सहवासात आलेल्या पस्तीस एक व्यक्तींची शब्दचित्रे या पुस्तकात बागलानी रेखाटली आहेत. त्या व्यक्तिचित्रांत काकासाहेब गाडगीळांपासून एस्. एम्. जोशी आणि शाहूछत्रपतीपासून भालजी पेंढारकरपर्यंत विविध क्षेत्रातल्या मान्यवर व्यक्ती आहेत. त्यात बागलांच्या एका आवडत्या कुत्रीचा समावेश आहे. या सर्व व्यक्तिचित्रांत बागलातला 'मी' डोकावणे साहजिक आहे. पण तो 'मी' नुसता डोकावत नाही. त्या मोठमोठ्या व्यक्तींच्या चित्रणावर त्या 'मी'ची जबरदस्त छाया पडल्याचे एकसारखे जाणवते, त्यामुळे ती माणसे खुजी वाटतात, अपुरी वाटतात. एरवी नामवंत असलेली ही माणसे जणू बागलांच्या सहवासात आपापली व्यक्तिमत्त्वे हरवून बसली आहेत !

तीनचार पानात एकेक व्यक्तिमत्त्व उभे करण्याचा बागलानी प्रयत्न केलेला आहे. पण चाळीसवर पुस्तके (पहा : मल पृष्ठ चार वरील यादी) लिहिणाऱ्या बागलांचे हे लिखाण कमालीचे शाळभरू झालेले आहे. एस्. एस्. सी. मधील विद्यार्थी याहून अधिक चांगले निबंध लिहितात ! बागल एक चांगल्यापैकी चित्रकार आहेत. ब्रशचे चार फटकारे मारून समोर बसलेल्या मॉडेलला 'थ्री डायमेन्शन्स' सह सजीव करण्याची कला त्याना अवगत आहे. पंचाहत्तर वर्षांच्या आयुष्यातील काही काळ त्यानी ज्या व्यक्तींच्या सहवासात घालविला, ज्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे कंगोरे त्याना जवळून न्याहाळता आले त्यांचं व्यक्तिमत्त्व तीनचार पानांच्या मर्यादेत उभे करणे वास्तविक पाहता अशक्य नव्हते. परंतु बागलांच्या व्यक्तिचित्रांना कुठेच खोली लाभत नाही. त्यांचे 'सहवासात' हे पुस्तक 'त्यामुळे' 'फ्लॅट' वाटते. निष्काळजीपणाने लिहिलेले, घाईघाईने कसेतरी ओढून काढलेले वाटते. लेखनातला हा शाळकरूपणा 'तिची आठवण' या कुत्रीवरील लेखातसुद्धा जाणवतो. हायस्कूलची जी हस्तलिखित मासिके असतात. त्यात शोभून दिसेल असा हा "ती मागोमाग येत होती-मग आमच्यातलं अंतर नाहीसं झालं- मी तिला प्रेमभरानं कुरवाळलं-तिचं चुंबन घेतलं व शेवटी गौप्यस्फोट : ती म्हणजे एक कुत्री होती." 'या धर्तीचा हा लेख. शामराव कवाळे या मातंग जातीतल्या एका व्यक्तीबद्दल लिहिताना मित्र म्हणजे काय, लहानथोर आपल्याला कसे सारखेच आहेत, यशवंतराव चव्हाण व शामराव कवाळे याना आपण कसे एकाच मापाने मोजतो याचं सोपपत्तिक विवेचन आहे. या चार पानी लेखातील शेवटच्या पाचसहा ओळीत कवाळेंचा उल्लेख आहे ! अनुक्रमणिकेत 'केशवराव भोसले'पासून उत्सुकतेने पान उघडावे तर सबंध लेख वाचून हे भोसले म्हणजे सुप्रसिद्ध नट 'केशवराव भोसले' नव्हेत एवढाच उलगडा होतो. बागलांना ज्यांच्याबद्दल सांगायचे आहे ते भोसले कोणते हे एक गूढच राहते. लक्षात राहते ती बागलानी केलेली मित्राची चमत्कारिक व्याख्या : जो तुमच्याकडे कारणाशिवाय येतो, कसल्याही इच्छेने येत नाही, केवळ भेटावं याच एका हेतूने येतो तोच खरा मित्र होय. 'माझे उपकारकर्ते' मध्ये बागलानी कोल्हापूरच्या डॉ. जाधवांचे स्वभावचित्र रेखाटले आहे. त्यात ते म्हणतात : "(डॉ. जाधवांच्या) दवाखान्यावर खुद्द महाराज, अक्कासाहेब महाराज खेपा घालीत व बाहेर बोलवत. पण त्याना सुद्धा सांगत 'आता मला फुरसत नाही. आणखी थोड्या वेळानं या' यावरून ते खालच्या सामान्य वर्गास कशा रीतीने वागवत याची कल्पना येईल."








आता ही डॉ. जाधवप्रशस्ती म्हणावयाची की दुसरे काही ?

अशी असंख्य उदाहरणे देता येतील.

पुस्तकात उद्गारचिन्हांची खैरात आहे. तीन तीन उद्गारचिन्हे मुक्तहस्ते देण्यात आली आहेत. तसेच कारण नसता मधूनच जाड टाईप वापरण्यात आला आहे. भाषा कमालीची बेंगरूळ आहे. मराठी शब्द तात्काळ आठवला नाही म्हणून इंग्रजी शब्द घुसडण्याचे अनेक प्रकार दाखवता येतील. उदा. ज्यांच्या सहानुभूतीची व सहकार्याची मला पूर्ण खात्री होती त्यानी कसं संपूर्ण इंडिफरन्स दाखवलं इत्यादी. पानापानागणिक मुद्रणदोष आहेत.

माधवरावजी वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी हे पुस्तक छापून काढायची खरोखरी गरज होती का !

– डॉ. सुभाष भेण्डे

( २ )

**सतीचे वाण : मोहन रानडे**

**सिंधू पब्लिकेशन्स प्रा. लि.**
**हिन्द राजस्थान चेंबर्स,**
**६ ओक लेन, मुंबई १**
( पृष्ठे ३१५ किंमत २० रुपये )

भारत सरकारने सैन्य पाठवून पोर्तुगीज अमलाखालील गोवा १९६१ च्या डिसेंबरमध्ये मुक्त केला. त्यापूर्वी गोव्यात भूमिगत चळवळ चालू होती आणि त्या चळवळीची सूत्रे बेळगाव व अन्य सरहद्दीवरील गावांतून हलवली जात होती. या मुक्तिसंग्रामात अनेक लोकानी भाग घेतला. खुद्द गोमंतकातील अनेकानी चळवळीत भाग घेऊन दीर्घ मुदतीचा कारावास भोगलाच- त्याचप्रमाणे गोव्याबाहेरील लोकानी, विशेषतः महाराष्ट्रीयनानी या संग्रामातील वाटा आपल्यापरीने उचलला. ' रणावीण स्वातंत्र्य कोणा मिळाले ! ' या उक्तीवर नितांत श्रद्धा असणाऱ्यांचा जो एक गट या चळवळीत भाग घेत होता त्या गटाचे मोहन रानडे एक अध्वर्यु. बेतीच्या पोलीसठाण्यावर हल्ला करीत असताना मोहन रानडे पोर्तुगीज सोल्जरांच्या हाती सापडले. त्याना सव्वीस वर्षांची कठोर कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. दरम्यान गोवा मुक्त झाला तरी रानडेंना पोर्तुगालमधील कशियशच्या तुरुंगात खितपत पडावे लागले. तब्बल साडेतेरा वर्षांच्या खडतर तुरुंगवासानंतर रानडे १९६९ च्या फेब्रुवारीच्या सुरवातीस भारतात आले. त्यांचे भारतात आगमन झाल्यानंतर एक वर्षाच्या आत त्यानी 'सतीचे वाण' ही आत्मकथा लिहून हातावेगळी केली. मुंबईच्या ' सिंधू पब्लिकेशन्स ' या नव्या प्रकाशनसंस्थेने ती उत्साहाने प्रकाशीत केली आहे. या पुस्तकाचा प्रकाशन समारंभ गोव्याच्या आठव्या मुक्तिदिनी मोठ्या थाटात पार पडला. गोवा मुक्तिसंग्रामात भाग घेऊन आलेले श्री. मधु लिमये यांच्या हस्ते पुस्तकाचे प्रकाशन झाले. पुस्तकाचे प्रकाशन करताना मधु लिमयेंनी म्हटल्याप्रमाणे भारतीय स्वातंत्र्य लढ्यातील हा कदाचित अखेरचाही ग्रंथ असेल !

रानडेंच्या या आत्मकथेचे दोन भाग पडतात. ते पोर्तुगीजांच्या हाती सापडेपर्यंत त्यानी सशस्त्र चळवळीचा जो पाठपुरावा केला त्याचा इतिहास पूर्वार्धात समाविष्ट करता येईल. त्यांच्या तुरुंगातील अनुभवांचा समावेश उत्तरार्धात होतो.

सांगलीला असताना वयाच्या पाचव्या वर्षापासून ते श्रीसमर्थ व्यायाम शाळेत नियमितपणे जात. तेथेच त्यांच्या मनाची जडणघडण झाली. मातृभूमीसाठी देहदंड सोसण्याची तयारी त्यानी तेथे केली. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या देशप्रेमाने ओतप्रोत भरलेल्या कविता त्यांच्या हृदयपटलावर कायमच्या कोरल्या गेल्या. कुसुमाग्रजांच्या ' गर्जा जयजयकार क्रांतीचा ' कवितेने त्याना दिशा दाखविली. चफेकर बंधू, भगतसिंग, सुखदेव यांच्या आत्मार्पणाच्या कथांनी त्याना भारून टाकले. लहानपणापासून त्यांच्या मनाचा पिंड घडला तो या अशा वातावरणात.

भारत स्वतंत्र झाला तरी गोवा पोर्तुगीजांच्या ताब्यात राहिला. याचे शल्य रानडेंच्या मनाला सलू लागले. १९४९ मध्ये या कोवळ्या तरुणाने सांगली सोडून गोव्याची वाट धरली. तेथे शिक्षकाचा पेशा स्वीकारून भूमिगत चळवळीच्या कामास प्रारंभ केला. 'आझाद हिंद सेने'पासून स्फूर्ती घेऊन








स्थापण्यात आलेल्या 'आझाद गोमंतक दल' ह्या संघटनेचे स्वयंसेवक म्हणून ते काम करू लागले. नगरहवेलीच्या मुक्तिसंग्रामात त्यानी भाग घेतला. त्यानंतर काही दिवस ते भूदान यज्ञात सामील झाले. १५ ऑगस्ट १९५५ ला गोव्याच्या सरहद्दीवर निःशस्त्र सत्याग्रह करण्यात आला आणि या सत्याग्रहींवर पोर्तुगीज सरकारने निर्घृणपणे गोळीबार केला. त्यामुळे रानडे व त्यांच्या सहकाऱ्यांचीं सशस्त्र चळवळीवरील श्रद्धा अधिकच दृढ झाली. पोलीस ठाण्यावर, खाडीवर हल्ले करून दहशतवादी मार्गाचा त्याना अवलंब करावासा वाटला याचे कारण अन्य उपायातील वैय्यर्थ त्याना मनापासून पटले हेच होते. १९५५ सालच्या विजयादशमीला रानड्यानी आपल्या सहकाऱ्यांसह बेनीच्या पोलीस ठाण्यावर हल्ला केला. तेथील बंदुका पळवणे हा त्यांचा उद्देश होता. या हल्ल्याच्या वेळी जबर दुखापत होऊन ते पोलीसांच्या हाती सापडले आणि इथूनच त्यांच्या जीवनातील नव्या पर्वास प्रारंभ झाला.

यानंतरचा सारा इतिहास म्हणजे अंधारकोठडीतील हालअपेष्टांचा इतिहास. ऐन तारुण्यातील बारा तेरा वर्षे रानड्याना तुरुंगात काढावी लागली या तुरुंगवासात रानड्याना विविध प्रकारचे अनुभव आले. मनुष्यस्वभावाचे तऱ्हेतऱ्हेचे नमुने त्याना पहावयास मिळाले. कठोर कारावासाला कंटाळून आपली सुटका करून घेण्यासाठी काहीही सांगण्यास तयार झालेला एक बडा पुढारी, बाळकृष्ण भोसल्याच्या मृत देहावर थोबाडीत मारणारे पोर्तुगीज अधिकारी, त्याना सख्ख्या भावाप्रमाणे वागविणारे पोर्तुगीज जोडपे मार्कुश आणि अल्विना, स्वातंत्र्याची गीते गाणारा निग्रो कवि गेर्ट यांसारख्या अनेक व्यक्तिरेखा रानडेंनी चित्रित केल्या आहेत. पोर्तुगालमधील कशियश तुरुंगात त्याना अंगोला, मोझांबीक या अन्य पोर्तुगीज वसाहतीतील स्वातंत्र्यसैनिक भेटले. सालाझारच्या जुलमी राजवटीविरुद्ध बंडाचा झेंडा उभारणारे खुद्द पोर्तुगालधील असंख्य तरूण त्याना भेटले. पोर्तुगीज जनता व साम्राज्यवादी, जुलमी पोर्तुगीज सरकार ही भिन्न आहेत याची जाणीव त्याना तेथे झाली.

साडेतेरा वर्षांचा प्रदीर्घ तुरुंगवास भोगत असताना व कदाचित् सर्वच्या सर्व सव्वीस वर्षांची सजा भोगावी लागण्याचा संभव असताना रानड्यांच्या पाठीचा कणा ताठ राहिलेला आहे. तुरुंगातील जुलुम-जबरदस्तीला त्यानी निर्धाराने उत्तर दिले आहे. 'मोडेन– पण वाकणार नाही' या ब्रीदामुळे त्याना अनेकदा कडक शिक्षा झाल्या; एकांतवास सहन करावा लागला, तुरुंगात मिळणाऱ्या बारीकसारीक सवलती काढून घेण्यात आल्या. पण 'की घेतले व्रत न हे अम्हि अंधतेने' ही त्यांची श्रद्धा होती. मातृभूमीसाठी 'पडो देह माझा, सदा ते नमी मी' ही त्यांची भावना होती. त्या बळावर त्यानी मरणप्राय यातना सहन केल्या. शिळ्या मांसाचे तुकडे, शिळा ब्रेड या जेवणावर वर्षानुवर्षे काढली. अंधारकोठडीच्या उकडहंडीत अनेकदा ते काळाचा हिशेब हरवून बसले. तरीपण त्यांचे मनोधैर्य खचले नाही.

इतके असूनही आपले अनुभव सांगत असताना रानडे नम्र आहेत. गोव्याच्या मुक्तिसंग्रामात भाग घेणाऱ्या अनेकांनी आपल्यापेक्षा अधिक हाल सहन केले आहेत, त्या मानाने आपण सोसलेले हाल काहीच नव्हेत असे त्यानी अनेकदा नमूद केले आहे. आपल्याबरोबर ज्या सहकाऱ्यांनी आंदोलनात भाग घेतला पण जे आता काळाच्या पडद्याआड गेले आहेत, ज्यांची नावनिशाणी राहिलेली नाही अशांचे त्यानी कृतज्ञतापूर्वक स्मरण केले आहे.

रानडेना चीड आहे ती भारतसरकारच्या अहिंसक बोटचेप्या धोरणाची. नगरहवेलीच्या मुक्तीसंग्रामाच्या वेळी मुंबईचे मुख्यमंत्री श्री. मोरारजी देसाई कसे वागले, सत्याग्रहींचा नेहरूनी ऐनवेळी अवसानघात कसा केला, गोवा मुक्त झाल्यानंतर पोर्तुगीज कैद्याना समारंभपूर्वक पोर्तुगालला पाठवून 'यह हमारी नीती नहीं हैं!' असा घोष करीत आपल्याला व अन्य काहींना पोर्तुगाल तुरुंगात खितपत पडायसा नेहरूनी कसे भाग पाडले हे विस्तारपूर्वक सांगून रानडेंनी भारत सरकारच्या अवसानघातकी धोरणावर संधि मिळेल तेव्हा हल्ला चढविला आहे. पोर्तुगालहून मुद्दाम भारतात आलेल्या व रानडेंच्या सुटकेसाठी प्रयत्न करणाऱ्या एका व्यक्तीची अर्धा

तास भेट घ्यायला पंत प्रधान इंदिरा गांधी तयार झाल्या नाहीत याची व्यथा रानडेनी व्यक्त केली आहे. त्याचप्रमाणे श्री. मस्करन्यश यानी 'आपण पोर्तूगीज आहोत - भारतीय नाही' असे सांगून आपली सुटका करून घ्यावी असा भेकड सल्ला परराष्ट्रमंत्री स्वर्णसिंगनी दिल्याबद्दल रानडेनी त्यांच्यावर कठोर प्रहार केले आहेत. गोव्यात सैन्य पाठविण्याचा निर्णय घेतल्यावरही नेहरूंच्या मनाची स्थिती कशी दोलायमान झाली होती. 'सैन्य पाठवू नका' म्हणून ऐनवेळी त्यानी कृष्णमेननना कसा फोन केला याचा वृत्तांत मायकेल ब्रेचरनी घेतलेल्या कृष्णमेनन यांच्या मुलाखतीत अनेकानी वाचला असेल. अमेरिकेचे राजदूत गालब्रेथ यांच्या 'दि अँम्बैसैडल जर्नल' मध्ये त्यांविषयी उल्लेख आहे. नेहरूंच्या 'पंचशील' धोरणाची ओळख असणाऱ्यांना रानडेना भारत सरकारचा आलेला अनुभव वाचून आश्चर्य वाटायला नको !

अखेरीस गोवा सैन्य पाठवून मुक्त करावा लागला हे खरे असले तरी त्यामुळे रानडे व त्यांच्यासारख्या अनेकांच्या कार्याचे मूल्य कमी लेखण्याचे कारण नाही. 'पोलीसठाण्यावर व खाणीवर हल्ले करून स्वातंत्र्य मिळत नसते' म्हणून हिणवणाऱ्या लोकाना त्यांच्या चळवळीचे इंगित समजले नाही असे म्हटले पाहिजे. गोव्यांत सर्व लोक सुखी आहेत, तिथे सर्व काही 'आलबेल' आहे अशी साऱ्या जगाची समजूत व्हावी हा पोर्तुगीज सरकारचा उद्देश होता. तिथे दहशतीचे वातावरण निर्माण करून पोर्तुगीजांची राजवट मुळापासून खिळखिळी करायची, अजगराप्रमाणे सुस्त पडलेल्या सालाझार शाहीला धक्के द्यायचे एवढेच रानडे प्रभृतींना साध्य करायचे होते. त्यांचा मार्ग कितपत बरोबर होता यांविषयी दुमत असू शकेल परंतु– त्यांची तळमळ, त्यांचे धाडस, जिवावर उदार होऊन चळवळीत भाग घेण्याची त्यांची वृत्ती–यांविषयी त्यांचे शत्रूसुद्धा शंका घेणार नाहीत.

स्वातंत्र्याच्या चळवळीत जिवाची बाजी लावून हौतात्म्य पत्करणाऱ्या वा पत्करण्यासाठी तयार असणाऱ्या स्वातंत्र्यसैनिकांच्या कथा काळाच्या प्रवाहाबरोबर वाहून जातात. आज गोव्याच्या राजकारणात पुढाकार घेणाऱ्या किती जणानी चळवळीत उडी घेतली होती व किती जणानी संसारावर निखारे ठेवले होते ! निरपेक्ष वृत्तीने सर्वस्वाचा होम करणारे विस्मृतीच्या पडद्याआड ढकलले जातात. फळे चाखण्यासाठी पुढे सरसावतात दुसरेच कुणी ! काळाच्या प्रवाहात हेही वाहून जाईल. उरेल फक्त 'सतीचे वाण'सारखा भारतीय सुपुत्रांच्या थोर कार्याचा ऊर्जस्वल इतिहास.

**– डॉ. सुभाष भेण्डे**

---












